भाग १

# बालभारती

# उत्तम संस्कार कथा

## इयत्ता दुसरी ते चौथी



# बालभारती

# उत्तम संस्कार कथा - भाग १

(इयत्ता दुसरी ते चौथी)

संपादन
**माधव राजगुरू**
विशेषाधिकारी - मराठी विभाग
पाठ्यपुस्तक मंडळ, पुणे ४



महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे

प्रथमावृत्ती : २००२
विशेष आवृत्ती : २०१०






| | | |
|---|---|---|
| कथानिवड व संपादन सहाय | : | **कन्नड - के. एस. हेगडे,** विद्यासचिव - भाषा<br>**इंग्रजी - धनवंती हर्डीकर,** विशेषाधिकारी - इंग्रजी<br>**हिंदी - अलका पोतदार,** विशेषाधिकारी - हिंदी<br>**उर्दू - मोमीन जी. एन.,** विशेषाधिकारी - उर्दू<br>**सिंधी - नागराणी विजय,** विशेषाधिकारी - सिंधी<br>**तेलुगु - तुलसी भारत,** विशेषाधिकारी - तेलुगु<br>**गुजराती - केतकी जानी,** विशेषाधिकारी - गुजराती<br>**मराठी - उषादेवी देशमुख,** विशेष सहायक - मराठी |
| मुखपृष्ठ | : | **चंद्रकांत तजबिजे** |
| निर्मिती | : | **श्री. सच्चिदानंद आफळे,** मुख्य निर्मिती अधिकारी<br>**श्री. सुनिल कसबेकर,** निर्मिती अधिकारी |
| अक्षरजुळणी | : | **मुद्रा विभाग,** पाठ्यपुस्तक मंडळ,<br>'बालभारती', सेनापती बापट मार्ग, पुणे - ४. |
| कागद | : | ७० जीएसएम्, क्रीमव्होव |
| मुद्रणादेश | : | N/Tech-2010-2011 (35,000) |
| मुद्रक | : | श्री महालक्ष्मी कॅलेंडर कं., मुंबई-७२. |
| प्रकाशक | : | **श्री. विवेक उत्तम गोसावी**<br>नियंत्रक,<br>पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ<br>प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५. |


## प्रस्तावना

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळनिर्मित उत्तम संस्कार कथेचा पहिला भाग आपल्या हाती देताना आम्हांस अत्यंत आनंद होत आहे.

शासनमान्य अभ्यासक्रमावर आधारित प्राथमिक स्तरांमधील इयत्ता पहिली ते आठवीपर्यंतच्या विद्यार्थ्यांसाठी सर्व विषयांच्या पाठ्यपुस्तकांची निर्मिती महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ करत असते. १९६७ पासून वेळोवेळी बदललेल्या अभ्यासक्रमानुसार मंडळाने आतापर्यंत बालभारतीच्या चार माला प्रकाशित केल्या आहेत. मंडळात मराठीबरोबरच हिंदी, इंग्रजी, उर्दू, कन्नड, सिंधी, तेलुगु, गुजराती अशा आठ भाषांमध्ये पाठ्यपुस्तकांची निर्मिती केली जाते. या आठही भाषांमधील बालभारतीच्या पाठ्यपुस्तकांत आतापर्यंत अनेक उत्तमोत्तम कथा प्रकाशित झाल्या आहेत. बाहेर कुठेही उपलब्ध होऊ न शकणाऱ्या बालभारतीतल्या अनेक उत्तमोत्तम निवडक संस्कार कथांचे पुस्तक मुलांच्या अवांतर वाचनासाठी प्रसिद्ध करण्याची कल्पना मंडळाच्या मराठी विभागाने मांडली, त्यानुसार मंडळ या कथा 'उत्तम संस्कार कथा' या नावाने तीन भागांत प्रसिद्ध करत आहे. विद्यार्थ्यांमध्ये चांगल्या वाचनाची आवड निर्माण व्हावी, त्यांच्या ज्ञानात भर पडावी, नकळत त्यांच्यावर चांगले संस्कार व्हावेत हा या पाठीमागचा हेतू आहे.

मराठीव्यतिरिक्त हिंदी, इंग्रजी, उर्दू, कन्नड, सिंधी, तेलुगु, गुजराती या भाषांच्या पाठ्यपुस्तकांतील कथांची निवड संबंधित भाषाधिकाऱ्यांनी केली आहे. अनुवादकांनी त्या त्या भाषेतील कथा मराठीत अनुवादित करून मोलाचे सहकार्य केले आहे, त्याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे.

सदर पुस्तके मुलांच्या पुरवणी वाचनासाठी प्राथमिक स्तरावरील शाळांनी वापरायची आहेत. मुलांना यातील कथा आवडतील अशी आशा आहे.

**(एन. के. राठोड)**
**संचालक**
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे ४.

## विशेष आवृत्तीची प्रस्तावना

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, 'बालभारती', पुणे या संस्थेने २००२ साली उत्तम संस्कार कथा तीन भागांत प्रकाशित केल्या आहेत.

प्राचीन काळात घरातल्या घरात दिल्या जाणाऱ्या नीतिशिक्षणाप्रमाणेच आजच्या काळात सार्वत्रिक शिक्षणात नीतिशिक्षणाचा किंवा दुसऱ्या शब्दात मूल्यशिक्षणाचा अंतर्भाव करण्याची गरज निर्माण झाली आहे. मुलांना उत्तम नागरिक बनण्यास सक्षम होण्यासाठी असे संस्कार साह्यभूत ठरु शकतील. याचा विचार करुन विद्यार्थ्यांना वाचनाची प्रेरणा मिळावी, वाचनातून त्यांची अभिरुची समृद्ध व्हावी आणि त्यांच्यावर सहजपणे उत्तम संस्कार व्हावेत, या भूमिकेतून उत्तम कथांची ही माला मुलांच्या अवांतर वाचनासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

या पुस्तकांना विद्यार्थी, शिक्षक व पालक यांचा उत्तम प्रतिसाद मिळत आहे. वाचकांचा हा प्रतिसाद लक्षात घेऊन 'बालभारती' संस्कार कथामालेची अधिक टिकाऊ स्वरुपातील विशेष आवृत्ती प्रकाशित करत आहे. त्यापैकी उत्तम संस्कार कथा भाग-१ हे पुस्तक आपल्या हाती देताना विशेष आनंद होत आहे. यातील संस्कार कथांच्या वाचनाचा लाभ जास्तीत जास्त विद्यार्थी, शिक्षक व पालक घेतील, अशी अपेक्षा आहे.

(एम.आर.कदम)
**संचालक**
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे-४.

पुणे
दि.१ जानेवारी २०१०

## प्रास्ताविक

गोष्टी ऐकणे आणि ऐकवणे ही आपली नैसर्गिक आवड आहे. प्राचीन काळी वेदवाङ्मयात काही कथा आढळतात. रामायण, महाभारत अशा पौराणिक वाङ्मयामध्ये अनेक कथा आणि उपकथानकांची जोड देऊन त्यांची गुंफण केलेली आढळते. अकराव्या शतकाच्या उत्तरार्धात काश्मिरी पंडित सोमदेव याने 'कथा सरित्सागर' हा ग्रंथ रचला. तेराव्या शतकात महानुभाव पंथीय ग्रंथांमधील लीळांच्या रूपात सांगितलेले 'दृष्टांत' छोट्या स्वरूपातील कथाच आहेत. तात्पर्य कथा हा अत्यंत प्राचीन आणि समृद्ध वाङ्मयप्रकार आहे. कहाण्या, परिकथा, बोधकथा, मिथ्यकथा, रूपककथा, लघुकथा ही कथेचीच विविध रूपे आहेत. यात आधुनिक काळात नवनव्या कथाप्रकारांची भर पडलेली आहे.

प्राचीन काळातील कहाण्याचे स्वरूप धार्मिक होते. या कहाण्या वडीलधाऱ्या स्त्रियांनी लेकी-सुनांना चांगले वळण लागावे म्हणून सांगितलेल्या असत. कहाणी ऐकणे ही मुलांची नैसर्गिक आवड असल्यामुळे पूर्वीच्या काळी एकच कुटुंबपद्धतीमध्ये आजी आपल्या नातवंडांना गोष्टी सांगत.

यातून आजीचा वेळ तर चांगला जात असेच, शिवाय मुलांची करमणूक आणि त्यांच्यावर चांगले संस्कार असे तीन हेतू साध्य होत, याला आपण घरातल्या घरात दिलेले नीतीपाठ किंवा नीतीशिक्षण असेही म्हणू शकतो.

प्राचीनकाळी घरातल्या घरात दिल्या जाणाऱ्या नीतिशिक्षणाप्रमाणेच आजच्या काळात सार्वत्रिक शिक्षणात नीतिशिक्षणाचा किंवा दुसऱ्या शब्दांत मूल्यशिक्षणाचा अंतर्भाव करण्याची गरज निर्माण झाली आहे. समाजातील काही घटकांत पोसलेला चंगळवाद, सर्व क्षेत्रे व्यापून राहिलेला भ्रष्टाचार, वाढता हिंसाचार यामुळे समाजाची अपरिमित हानी झाली आहे. समाजाच्या या अधःपतनाचे प्रमुख कारण म्हणजे समाजाची नीतिमूल्यांशी झालेली फारकत हेच

होय; म्हणून समाजाची पायाभरणी करणाऱ्या शिक्षणक्रमात प्राथमिक स्तरावरील मुलांना नीतिमूल्यांच्या संस्काराचे धडे देण्याची सोय केल्यास भावी समाजाचे चित्र आशादायी असेल.

आजचा काळ नभोवाणी, दूरचित्रवाणी, चित्रपट, संगणक यांच्या प्रभावांचा काळ आहे. माणसाने माणसांसाठी निर्माण केलेल्या या सोई आहेत. या अत्याधुनिक सुखसोयींमुळे माणसाचे वाचन कमी होत चालले आहे. अशा परिस्थितीमध्ये मुले शाळेमध्ये जेवढा काळ शिक्षण घेत असतात, त्या काळात तरी त्यांना चांगले साहित्य वाचण्यासाठी उपलब्ध करून दिले पाहिजे; जेणेकरून मुलांच्या मनावर चांगले संस्कार बिंबून ते उत्तम नागरिक बनण्यास सक्षम होतील.

मुलांवर चांगले संस्कार केवळ कथेतूनच होतात असे नाही. वेगवेगळ्या क्षेत्रांमध्ये यशाची उत्तुंग शिखरे गाठलेल्या थोर व्यक्तींच्या जीवनचरित्रातूनही मुलांना उत्तम शिकवण मिळत असते. प्रतिकूल परिस्थितीतही कर्तृत्वाचे डोंगर उभे करणाऱ्या या व्यक्ती सदैव मार्गदर्शन करणाऱ्या दीपस्तंभाप्रमाणे असतात; म्हणून या संस्कार कथासंग्रहांमध्ये जगदीशचंद्र बोस (तेलुगु), विक्रम साराभाई (गुजराती), सुभाषचंद्र बोस (हिंदी), आर्यभट्ट (सिंधी), भगवान गौतम बुद्ध (मराठी) अशा थोर व्यक्तींच्या जीवनचरित्राचा समावेश केला आहे.

मुलांची संवेदनशीलता आणि त्यांचे भावविश्व जपणाऱ्या आणि समृद्ध करणाऱ्या अनेक कथा या संग्रहात आलेल्या आहेत. पप्पू आणि चिमणीचं घरटं (गुजराती), मनोज (इंग्रजी), मैत्री (उर्दू), पाच रुपयाचा शिक्का (उर्दू), ठोकळ्याचे चित्र (मराठी) यांसारख्या कथा मुलांची मनं जाणून घ्यायला मोठ्यांनाही मदत करणाऱ्या आहेत.

मुलांच्या भावविश्वाची दखल घेणाऱ्या या कथा मुलांवर उत्तम संस्कार करतील आणि त्यांना वाचनाची प्रेरणा मिळून त्यांची अभिरूची समृद्ध होण्यास साह्यभूत ठरतील अशी आशा वाटते.

# अनुक्रमणिका

# १. डोळ्याचा भाव

रात्री दहा-अकराची वेळ. शहरात निजानीज झाली होती. दिवसा गर्दीगोंगाटाने गजबजून गेलेले शहर आता शांत होते. अशा शांत वेळी शहरातील रिकाम्या रस्त्याने एक भिकारी मोठमोठ्याने ओरडत चालला होता —"देवा, तू मला काही दिलं नाहीस. मला राहायला घर नाही. अंगावर घालायला कपडे नाहीत. भरपूर खायला-प्यायला नाही. देवा, तू माझ्यावर फार अन्याय केला आहेस रे."

त्या गल्लीत एक श्रीमंत माणूस राहत होता. लांडीलबाडी न करता सचोटीने व्यापारधंदा करून त्याने पुष्कळ पैसे मिळवले होते. या वेळी तो एका नामांकित गवयाचे गाणे ऐकत बसलेला होता. गाणे छान रंगले होते आणि तशात भिकाऱ्याचे ओरडणे ऐकू आले— "देवा, तू मला काही काही रे दिलं नाहीस. आनंद होईल अशी एखादी जरी गोष्ट माझ्यापाशी असती, तरी मी तक्रार केली नसती; पण देवा, तू मला भिकाऱ्यापेक्षा भिकारी केलं आहेस."

त्या श्रीमंत माणसाचे मन ते ओरडणे ऐकून कळवळले. त्याने हात वर करून म्हटले, "गवईमहाराज, माफ करा. थोडा वेळ गाणं थांबवा !" आणि त्याने आपल्या नोकराकरवी भिकाऱ्याला वर बोलावले.

भिकारी थोडा घाबरला. असे बोलावणे त्याला कधी आले नव्हते. त्याला वाटले, हे मोठे घर कोणा मोठ्या अधिकाऱ्याचे असेल. आपल्या ओरडण्यामुळे त्यांना राग आला असेल. काय होईल ? फार तर रट्टे मिळतील. हळू आवाजात ओरड, अशी ताकीद मिळेल. मग तो भिकारी त्या श्रीमंतापुढे जाऊन उभा राहिला. श्रीमंताने त्याला विचारले, "बाबा रे, तू रस्त्यानं काय

ओरडत चालला होतास ?''

''महाराज, मी तुमचं नाव नाही घेतलं. मी आपला देवाच्या नावानं ओरडत होतो.''

''का बरं ? देवानं असं तुझं काय वाईट केलंय ?''

''महाराज, देवानं मला काही दिलं नाही. तुमच्यासारखा मोठा वाडा नाहीच, पण साधं घरसुद्धा नाही. तुमच्यासारखे रेशमी कपडे तर नाहीतच; पण अंग झाकण्यापुरते कपडेही त्यानं मला दिले नाहीत.''

श्रीमंताने विचारले, ''तुला पैशाची गरज आहे का ? मी पैसे देईन, त्याबद्दल तू तुझी एक वस्तू मला दिली पाहिजेस.''

भिकारी म्हणाला, ''सावकार, माझी गरिबाची चेष्टा करताय ? तुम्हांला द्यावं असं माझ्यापाशी काय आहे ?''

श्रीमंत म्हणाले, ''मला तुझा एक डोळा पाहिजे. देशील ?''

''डोळा ?''

''शंभर रुपये देईन !''

भिकाऱ्याला काहीच कळेना. त्याने मानेने हो म्हटले.

''ठीक आहे. दिवाणजी, द्या याला शंभर रुपये.''

एकाएकी भिकाऱ्याला वाटले, आपण काही चूक तर केली नाही ? तो घाईघाईने म्हणाला, ''नाही महाराज. थांबा. मी एक हजार रुपये घेईन, म्हणजे दहा शंभर.''

''काही हरकत नाही. दिवाणजी, दहा शंभर द्या.''

भिकारी गोंधळला. इतक्या लवकर सौदा ठरतो आहे, तेव्हा आपण फारच कमी किंमत सांगतोय. दहा शंभर ही काही डोळ्याची खरी किंमत नसावी, असे त्याला वाटले.

''महाराज, मी दहा हजार घेईन.''



''ठीक आहे. दिवाणजी, याला दहा हजार द्या.''

आता मात्र भिकारी फार गोंधळला. बाजारात डोळ्यांचा भाव नक्की काय आहे, हे त्याला कळेना. तो पुन्हा ओरडून म्हणाला, ''महाराज, माफ करा. मला एक लाख रुपये म्हणायचं होतं. ते चुकून तोंडातून दहा हजार गेलं.''

''काही हरकत नाही. एक लाख घे.''

भिकारी गप्प झाला. त्याच्या मनात विचार आला, की एका डोळ्याची किंमत जर एक लाख रुपये, तर काय दोन डोळे म्हणजे दोन लाख ? दोन कान म्हणजे चार लाख ? एक नाक म्हणजे आणखी एक लाख ? मग डोळे, नाक, कान, हात, पाय या सगळ्या शरीराची किती किंमत असेल ? शिवाय हातापायांचा भाव नक्कीच जास्त असणार. म्हणजे एका-एका हाताचे दोन-दोन लाख. आणि हे पाय ? हे डोके ? त्याचे किती लाख ?

भिकाऱ्याला हिशेब जमेना. किती लाखांचे हे शरीर आहे, हे त्याला नक्की समजेना. तो शरमला आणि श्रीमंतापुढे वाकून हात जोडून म्हणाला, ''महाराज, मी देवाला फुकट दोष दिला. त्यानं मला धट्टंकट्टं शरीर दिलं आहे, म्हणजे पुष्कळ दिलं आहे. माझी ओरड खोटी आहे. क्षमा करा.''

लेखक - व्यंकटेश माडगूळकर

❑❑❑

मराठी
बालभारती : इयत्ता २ री
पहिली माला : १९६९

# २. बैल झपाटला

खंडू पाटलांचे बैल खिलारी जातीचे होते. ते त्यांना प्रेमाने सरदार आणि दिलदार म्हणत. ते बैलांची उत्तम निगा राखत. त्यामुळे बैल नेहमी धष्टपुष्ट आणि जोमदार असत.

खंडू पाटलांनी चाबकाचा खुळखुळा वाजवला, की बैलांना इशारा मिळे. गाडीत कितीही ओझे असले, तरी ते गाडी भिंगरीसारखी पळवत.

एके दिवशी पाटलांची गाडी शेतातून दौडत येत होती. गाडीत धान्याची पोती होती. वेशीजवळ गाडी येताच सरदार एकदम उभा राहिला आणि मटकन खाली बसला.

झाले, खंडू पाटलांच्या तोंडचे पाणी पळाले. त्यांनी गाडीतून खाली उडी मारली. मूठभर माती घेऊन बैलावरून ओवाळून टाकली. त्याच्या पाठीवर थाप मारली. 'सरदार, सरदार' म्हणून शेपटीला हात घातला, पण सरदार काही उठेना.

खंडू पाटलांचा बैल पळता पळता एकदम बसला, ही बातमी हा हा म्हणता गावभर पसरली. माणसांची तेथे गर्दी जमली.

कोणी म्हणे, 'बैल दृष्टावला.'

कोणी म्हणे, 'भर दुपारची वेळ. बैल झपाटला.'

पाटलीण धावतच वेशीत आली. बैलाला पाहून ती झटकन शेजारच्या घरात गेली. बचकभर मिरच्या, चिमूटभर मीठ, काळा काळा बिब्बा लगबगीने घेऊन आली. तिने बैलांची दृष्ट काढली. राखेची चिमूट घेऊन खंडोबाच्या नावाने अंगारा लावला; पण सरदार काही उठेना. कसेबसे करून लोकांनी त्याला घरी आणले.

एक दिवस झाला. दोन दिवस झाले. बैल उभा राहिना. काही खाईना-पिईना. अनेक उपाय केले. मांत्रिकांचेही उपचार झाले. गुण काही आला नाही. पाटलांचा चेहरा काळजीने काळवंडून गेला. त्यांना काही सुचेनासे झाले.



तालुक्याला गुरांचा दवाखाना होता. दवाखान्याचे डॉक्टर हुशार होते. ते शेतकऱ्यांत मिळून मिसळून वागत असत. त्यांना खंडू पाटलांच्या बैलाची हकीकत समजली. ते बैलाला पाहण्याकरिता पाटलांच्या घरी गेले. त्यांच्याबरोबर लोकांचा घोळका होताच.

डॉक्टरांनी बैलाच्या पायांचे खूर लक्षपूर्वक पाहिले. त्यांनी जमलेल्या मंडळींना विचारले, "बैलाला काय झालं असावं ?"

बहुतेकांनी सांगितले, 'बैल झपाटला.'

डॉक्टर हसले. त्यांनी बैलाचा दुखावलेला पाय पकडून ठेवण्यास सांगितले. आपल्या पेटीतून काही हत्यारे काढली. बैलाच्या पायात रुतलेला एक बारीकसा खिळा त्यांनी चटकन उपसून काढला. खिळा निघताच बैल पाय झाडत झटकन उभा राहिला. लोक डॉक्टरांकडे टकमका पाहू लागले.

खंडू पाटलांना व त्यांच्या बायकोला अतिशय आनंद झाला.

लेखक - रा. शं. शिंदे

❑❑❑

मराठी
बालभारती : इयत्ता २ री
तिसरी माला : १९९०

## ३. दिनूचे बिल

दिनूचे वडील डॉक्टर होते. दिनू कधी कधी त्यांच्याबरोबर दवाखान्यात जात असे. तेथे पुष्कळसे लोक येत. कोणी तपासून घेण्यासाठी येत. कोणी औषध घेण्यासाठी येत. कोणी म्हणे, 'डॉक्टर, माझं पोट दुखतं, मला तपासा.' तर कोणी म्हणे, 'डॉक्टर, माझं बिल किती झालं आहे ते सांगा.'

दिनू एका लहानशा खुर्चीवर बसून ते सारे पाहत असे आणि ऐकत असे. दवाखान्यातल्या बऱ्याचशा गोष्टी त्याला आता कळू लागल्या होत्या; पण बिल म्हणजे काय ते अजून त्याला कळले नव्हते.

दिनूने एके दिवशी वडिलांना विचारले, "बाबा, बिल म्हणजे काय हो ?"

डॉक्टरांनी टेबलावरचा एक कागद घेतला आणि दिनूला दाखवला, "हे बघ. याला बिल म्हणतात. वाच." डॉक्टर म्हणाले. दिनू तो कागद वाचू लागला.

| | रुपये - पैसे |
|---|---|
| रोग्याला तपासल्याबद्दल | १० = ०० |
| दोनदा येण्याबद्दल | २० = ०० |
| आठ वेळा औषधाबद्दल | ८ = ०० |
| एकूण रुपये | ३८ = ०० |

दिनू ते बिल कितीतरी वेळ वाचत होता. तो एकदम मधेच हसला. त्याला काय वाटले कुणास ठाऊक. काहीतरी विचार त्याच्या डोक्यात आला.



घरी गेल्यावर दिनू आपल्या खोलीत गेला आणि कागदावर त्याने आपल्या आईच्या नावाने एक बिल तयार केले.

| | रुपये - पैसे |
|---|---|
| आज बागेतून फुले आणल्याबद्दल | ०० = ५० |
| बाळाला दोन तास सांभाळल्याबद्दल | २ = ०० |
| शेजारच्या काकूंकडे निरोप घेऊन गेल्याबद्दल | १ = ०० |
| दुकानातून साखर आणल्याबद्दल | ०० = ५० |
| एकूण रुपये | ४ = ०० |

ते बिल त्याने आईच्या खोलीत नेऊन ठेवले.

दुसऱ्या दिवशी दिनू सकाळी उठला. त्याच्या उशाशी चार रुपये ठेवलेले होते. दिनूने ते उचलले. तेवढ्यात तेथे ठेवलेला एक कागद त्याच्या दृष्टीस पडला. त्याच्यावर काहीतरी लिहिलेले होते. त्याने कागद उचलला व चटकन वाचला. आईने दिनूच्या नावाने बिल केले होते.

| | रुपये - पैसे |
|---|---|
| लहानपणापासून आतापर्यंत वाढवल्याबद्दल | काही नाही |
| चारदा आजारपणात दिवसरात्र जागून काळजी घेतल्याबद्दल | काही नाही |
| गोष्टी सांगून करमणूक केल्याबद्दल | काही नाही |
| वाचायला शिकवल्याबद्दल | काही नाही |
| एकूण | काही नाही |

दिनूच्या डोळ्यांत एकदम पाणी आले. त्याचा गळा भरून

आला. त्याच्या हातातला कागद गळून पडला. ते पैसे घेऊन तो तसाच आईकडे धावत गेला.

काही न बोलता त्याने आईला पैसे परत केले व तो आईच्या मांडीवर डोके ठेवून रडू लागला.

आईने दिनूला कुरवाळले व त्याचा मुका घेत ती म्हणाली, ''तुझ्या बिलाचे पैसे पावले बरं दिनू !''

लेखक - प्र. के. अत्रे



मराठी
बालभारती : इयत्ता २ री
तिसरी माला : १९९०



# ४. शेजारधर्म

राणोजी खोत आपल्या ओसरीवर बसले होते. त्यांच्या शेजारी त्यांचा मुलगा पुढ्यात पुस्तके पसरून बसला होता. त्याचे अभ्यासात लक्ष लागत नव्हते. त्याचे सारे लक्ष गलोल तयार करण्यातच होते. हातात रबराच्या पातळ पट्ट्या घेऊन तो गलोल तयार करत होता. तेवढ्यात शेजारचे हरिबाबा पवार काठी टेकत आले. त्यांची चाहूल लागताच राणोजी खोत म्हणाले, ''या मालक, कसं येणं केलं ?''

हरिबाबांनी सुस्कारा सोडला आणि काठीचा आधार घेत बैठक मारली. राणोजींनी पुन्हा विचारले, ''कसं काय येणं केलं ?''

हरिबाबा म्हणाले, ''तुमच्या रामला घडीभर आमच्याकडं पाठवून द्या. थोडं काम आहे.''

''पाठवून देतो. काही काळजी करू नका,'' असे राणोजी त्यांना म्हणाले, पण मध्येच राम कुरकुरत म्हणाला, ''बाबा, आज मला शाळेचा फार अभ्यास आहे. आज नाही मला जायला जमणार.'' यावर राणोजींनी आपल्या मुलाला मध्येच अडवून म्हटले, ''अरे, अभ्यास करच, पण आज थोडं कमी खेळ.''

राम वडिलांच्या धाकात होता. तो काही बोलला नाही. थोड्या वेळाने हरिबाबा निघून गेले. ते गेल्यावर राणोजी रामला म्हणाले, ''राम, अरे, आपल्या शेजाऱ्यांनी काही काम सांगितलं, तर लगेच असं नाही म्हणू नये. शेजारधर्माला जागून तू त्यांच्याकडे जायला पाहिजे. समज, तू गेला नाहीस, तर त्यांचं काम अडणार आहे का ? नाही अडायचं. दुसरा कोणीतरी येऊन त्यांना मदत करीलच; पण मग तुझ्याबद्दल त्यांना काय वाटेल ?''

राम थोडा वरमला. काय बोलावे हे त्याला सुचेना. तरीपण तक्रारीच्या सुरात तो म्हणाला, ''पण बाबा, गोड गोड बोलून हरिबाबा नेहमीच माझ्याकडून काम करून घेतात.''

''मग त्यात काय बिघडलं ? अरे, माणसानं कष्ट करायला कंटाळू नये. कष्ट करण्यानं माणसाच्या अंगातील ताकद वाढते. शिवाय लोकांचा भलेपणा मिळतोच. हा फायदा फार मोठा आहे. तो जन्मभर तुला पुरणार आहे.'' असे म्हणून राणोजी आपल्या मुलाला पुढे म्हणाले, ''समज, उद्या आपल्याला कोणाची गरज लागली आणि आपल्याला शेजाऱ्यांनी तुझ्यासारखं उत्तर दिलं, तर आपल्याला काय वाटेल ?''

रामने काही उत्तर दिले नाही. तो गप्प बसला. मग राणोजी त्याला म्हणाले, ''तू तसा समजूतदार मुलगा आहेस, म्हणून तुला सांगतो, ऐक.'' असे म्हणून त्यांनी आपल्या हाताचा पंजा त्याच्यासमोर धरला आणि विचारले, ''माझ्या हाताला किती बोटं आहेत ?''

राम म्हणाला, ''पाच.''

''ही पाची बोटं सारखी आहेत का ?''

''नाही. लहान-मोठी आहेत.''

यावर राणोजी हसले आणि म्हणाले, ''अरे, ही आपल्या हाताची पाची बोटं सारखी नाहीत; पण ही पाची बोटं मिळूनच हाताचा पंजा झाला आहे की नाही ? तसं पाहिलं तर प्रत्येक बोट आपल्या परीनं स्वतंत्र आहे. तरी एका बोटाला लागलं, की शेजारच्या बोटाला दुःख होतंच. त्यांच्यातील सुखदुःखाची जाणीव एकच आहे. कोणतीही कामं करताना ती एकोप्यानं करतात. ही बोटं म्हणजे एकमेकांचे शेजारीच. शेजाऱ्यांनी परस्परांच्या उपयोगी



पडावं.''

रामला आपल्या वडिलांचे सांगणे एकदम पटले. तो हसला. आपल्या हाताच्या पंजाकडे त्याने पाहिले. पंजाची हालचाल केली. मूठ दाबली आणि उघडली व तो आपल्या वडिलांच्याकडे बघून म्हणाला, ''बाबा, तुम्ही म्हणता ते खरं आहे. मी जातो हरिबाबांकडे. त्यांचं काय काम असेल ते करतो.''

रामच्या वडिलांना त्याच्या या उत्तराने मोठा आनंद झाला.

लेखक - ना. ह. आपटे

❑❑❑

मराठी
बालभारती : इयत्ता ३ री
पहिली माला : १९६९

# ५. देवाला सारी प्रिय

संध्याकाळचे चार-पाच वाजण्याची वेळ होती. श्यामची आई देवळात गेली होती. श्याम घरीच होता. देवदर्शन करून आई आली, तेव्हा श्यामने विचारले, "आई, मी जाऊ का बाहेर ?"

आई म्हणाली, "श्याम ! तू जा. परंतु तुला एक काम सांगते, ते आधी कर. रस्त्यात एक बाई आहे. म्हातारी आहे अगदी. तिच्या डोक्यावरची लाकडाची मोळी खाली पडली आहे. ती बाई आजारी व अशक्त दिसते आहे. तिच्या डोक्यावर मोळी दे व घरी ये."

श्यामने विचारले, "आई, लोकांनी बघितलं तर ते मला हसतील; मला मारायला येतील. खरंच का मी जाऊ ?"

"लोकांना सांग, की ती म्हातारी इथं किती वेळ कोणी मदतीला येतो का म्हणून वाट पाहत बसणार ? मोळी विकून तिला परत जायचं आहे." श्यामची आई म्हणाली.

आईचे म्हणणे ऐकायचे एवढे श्यामला ठाऊक. तो गेला. त्याने त्या म्हातारीला विचारले, "का ग, डोक्यावर का द्यायला हवी आहे मोळी ? मी देतो." असे म्हणून श्याम एकीकडून मोळी उचलू लागला.

"नको रे दादा ! तुम्ही बामण. कोणी पाहिलं तर मारतील मला." ती गयावया करून विनवू लागली; पण श्यामने तिच्या डोक्यावर मोळी चढवली.

"अरे श्याम, तिला शिवलास काय ?" श्रीधरभट कोठूनसे अकस्मात उगवले व श्यामला बोलू लागले. त्यांचा शब्द ऐकून शेजारच्या घरात ओसरीवर बसलेले दुसरेही लोक बाहेर आले व श्यामला बोलू लागले.



श्याम त्यांना म्हणाला, "ती म्हातारी किती वेळ थांबेल ? काळोख होईल तिला जायला. नदीतून जायचं आहे तिला."

श्याम घरी आला. त्याची आई म्हणाली, "त्या म्हातारीला आपल्याकडंच हाक मार. अजून इथंच असेल बघ. कुठं लांब जाईल मोळी घेऊन ? आपल्याकडची लाकडंही सरली आहेत."

"ए मोळीवाली, इकडं ये." पुढे जाऊन श्यामने तिला हाक मारली. ती आली. श्यामच्या आईने तिला विचारले, "म्हातारे, आजारी का ग आहेस ?"

"व्हय माय. ताप लई येतो. काय करताव, पोटाला हवं ना ?" असे ती म्हणाली.

श्यामने कणगीतून भात काढून आणले व तिच्या पदरात घातले. त्याच्या आईने दुपारचा उरलेला भात पत्रावळीवर आणला. अंगणाच्या कडेला बसून त्या म्हातारीने तो खाल्ला. पाणी पिऊन दुवा देत ती निघून गेली.

श्यामची आई म्हणाली, "श्याम, महार असो वा मांग असो, सर्वांना मदत करावी. देवाला सारी प्रिय आहेत; कारण सारी त्याचीच लेकरे आहेत. तू माझा म्हणून मला आवडतोस, तशी आपण सारी देवाची म्हणून सारी त्याला आवडतात. मला आवडेल ते तू करतोस, त्याप्रमाणं देवाला आवडेल ते करण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे."

लेखक - साने गुरुजी

❑❑❑

मराठी
बालभारती : इयत्ता ३ री
पहिली माला : १९६९

## ६. मोठे मन

एके दिवशी एका गावात एक साधू आला. गावाबाहेरच्या धर्मशाळेत तो उतरला. धर्मशाळेची बरीच पडझड झाली होती. एकच खोली कशीबशी तग धरून उभी होती. तीदेखील फार अरुंद व छोटी होती. साधूने ती खोली साफसूफ केली. आपली पथारी पसरली. खूप थंडी होती म्हणून खोलीचे दारही बंद करून घेतले. तो आडवा झाला. जेमतेम एका व्यक्तीला झोपता येईल एवढीच जागा होती.

रात्र झाली, तसा थंडीचा कडाका वाढला. अंगावर पांघरूण घेऊन तो पडून राहिला. इतक्यात दारावर टकटक झाली. दाराच्या फटीतून साधूने पाहिले. बाहेर कुणीतरी कुडकुडत दारात उभा असलेला त्याला दिसला. दार उघडून साधू त्याला म्हणाला, ''अरे, आत ये ना. बाहेर थंडीवाऱ्यात कशाला उभा राहतोस ? ये, आत ये.''

तो एक वाटसरू होता. रात्र झाली म्हणून निवाऱ्यासाठी तो येथे आला होता. त्याने आत डोकावून पाहिले. जेमतेम एका व्यक्तीला झोपता येईल अशी ती लहान जागा बघून तो थोडा संकोचून म्हणाला, ''खोली फारच लहान दिसते. या एवढ्याशा जागेत आपण दोघं कसे मावणार ? त्यापेक्षा मी बसतो इथं बाहेरच — या भिंतीचा आसरा घेऊन.''

साधू बोलला, ''भल्या माणसा, तू असा बाहेर थंडीत कुडकुडत बसणार आणि मी खुशाल झोपू ? ते काही नाही. तू आत ये कसा. आपण दोघंही आत बसू. दोघांना बसण्याएवढी जागा इथं नक्कीच आहे.''



असे म्हणून साधूने त्या वाटसरूला बळेच आत घेतले. ते दोघे कसेबसे त्या खोलीत बसले. थंडी होतीच, त्यात भर म्हणून वारेही वाहू लागले. साधूने दार बंद केले.

थोडा वेळ गेला आणि पुन्हा बाहेर कसलीतरी हालचाल झाली. दाराच्या फटीतून साधूने पाहिले. भिंतीचा आसरा घेऊन कोणीतरी बाहेर उभा आहे असे त्याला दिसले. थंडीमुळे तो थरथर कापत होता. त्याची ती अवस्था बघून दार उघडत साधू म्हणाला, ''कोण रे बाबा तू ?''

''थंडीने काकडत तो म्हणाला, ''मी आहे एक यात्रेकरू.''

साधू बोलला, ''अरे, मग असा बाहेर का ? आत ये ना.''

यात्रेकरूने पाहिले. ते दोघे कसेबसे दाटीवाटीने बसलेले त्याला दिसले. तिसऱ्याला बसता येईल एवढी जागा तेथे नव्हती. तो म्हणाला, ''तुम्ही बसा. मी आत येऊन तुम्हांला अडचण कशाला करू ?''

साधू म्हणाला, ''दोघांनी आत बसायचं आणि तिसऱ्यानं बाहेर असं कुडकुडायचं ? त्यापेक्षा आपण असं करू - आपण तिघंही दाटीवाटीनं उभं राहू. ये, तू आत ये.''

फारच आग्रह केला, तेव्हा तो यात्रेकरू खोलीत आला. ते तिघे दाटीवाटीने खोलीत उभे राहिले. त्या यात्रेकरूला हे बरे वाटले नाही. न राहवून तो पुन्हा म्हणाला, ''साधूमहाराज, माझ्यामुळं तुम्हांला अडचण झाली. तिघांनी असं अवघडून आत उभं राहण्यापेक्षा तुम्ही आरामात बसा. मी बाहेर जातो.''

साधू काही ऐकेना. तो म्हणाला, ''ते काही नाही. आपण तिघंही दाटीवाटीनं उभं राहू.'' असे म्हणून साधू हसला आणि पुन्हा म्हणाला, ''ही थंडी कायम थोडीच राहणार आहे ? ती आली आहे

आपली मनं केवढी आहेत ते पाहायला. मन मोठं असलं की लहान घरही मोठं होतं. काय, खरं ना ?''

असे म्हणून साधूने दार लोटले आणि ते तिघेही आत उभे राहिले. एकमेकाला खेटून उभे राहिल्याने थोड्या वेळातच त्या खोलीत ऊब निर्माण झाली आणि थंडी पळून गेली.

लेखक - वसंत मिरासदार



मराठी
बालभारती : इयत्ता ३ री
दुसरी माला : १९८२



## ७. भाकरीची गोष्ट

शरद आपल्या आजोळी खेड्यात आला होता. ते दिवस सुगीचे होते. कापणी-मळणी सुरू होती. कामाची नुसती धमाल होती. अशा वेळी जो तो शेतावरच असे. घरात कोणी बसत नसे.

शरदही आपल्या आजोबांच्या बरोबर शेतावर गेला. ज्वारीची कापणी चालू होती. आल्या आल्या आजोबा आपल्या कामाला लागले. होता होता दुपार झाली. काम थांबवून आजोबा विहिरीवर आले. शरद झाडाच्या सावलीत बसला होता. त्याला हाक दिली. तो आल्यावर दोघे विहिरीकडे गेले. पाणी काढले. हातपाय धुतले. विहिरीजवळ झाडाच्या सावलीत जेवायला बसले. सकाळी घरून जेवण आणले होते. आजोबांनी दोघांचेही वाढून घेतले.

थोड्या वेळाने अर्धी भाकरी टाकून शरद उठला. आजोबा म्हणाले, ''का रे, भाकरी का टाकलीस ?''

शरद म्हणाला, ''माझं पोट भरलं. पुरे मला.''

यावर आजोबा म्हणाले, ''मग वेड्या, जेवढं खायचं होतं, तेवढंच नाही का घ्यायचं ? अन्न टाकून असं उठू नये. अन्न वाया घालवू नये.''

शरद हसून म्हणाला, ''आजोबा, असं किती अन्न वाया जाणार आहे ? मी तर फक्त अर्धी भाकरी टाकून उठलो.''

आजोबा म्हणाले, ''अरे, अर्धी असो की कोरभर. तुझ्यासारख्या लाखो मुलांनी अशी अर्धी भाकरी टाकली, तर किती अन्न वाया जाईल ? आणि भाकरीसाठी किती कष्ट करावे लागतात, किती घाम गाळावा लागतो, याची कल्पना आहे का तुला ? ती सहजासहजी मिळत नाही.''

हे ऐकून तो पुन्हा खाली बसला आणि खाऊ लागला. आजोबा म्हणाले, "तू नेहमी म्हणतोस ना, गोष्ट सांगा. आज मी तुला भाकरीचीच गोष्ट सांगतो."

"सांगा, सांगा." शरद गोष्ट ऐकण्यासाठी अधीर झाला.

आजोबांनी विचारले, "भाकरी कशाची करतात ?"

शरद पटकन म्हणाला, "ज्वारीची किंवा बाजरीची."

"ही ज्वारी किंवा बाजरी कुठून येते ?"

शरद म्हणाला, "ज्वारी, बाजरी दुकानात मिळते."

"ती दुकानात कुठून येते ?"

"त्यात काय अवघड ?" असे म्हणून शरद म्हणाला, "ती शेतातून येते."

"ती शेतात कशी येते ?"

इथे मात्र शरद अडला. तो आजोबांकडे बघतच राहिला.

"नाही ना ठाऊक तुला ? ऐक तर मग." असे म्हणून आजोबा सांगू लागले, "त्याचं असं आहे — आधी जमीन नांगरायची. मातीची ढेकळं फुटण्यासाठी कुळव फिरवायचा."

"हां, मग पेरायचं ना ?"

आजोबा म्हणाले, "लगेच पेरायचं नाही. ढेकळं फोडून जमीन सारखी झाली, की मग खत घालायचं आणि पावसाची वाट बघायची. पुरेसा पाऊस पडला, की पेरणी करायची. पेरणी झाली, की मग हिरवी हिरवी रोपं उगवतील. त्यानंतर भांगलण करावी लागेल."

शरदने विचारले, "भांगलण म्हणजे काय ?"

आजोबा म्हणाले, "खुरप्यानं जमिनीतील तण काढायचं. प्रत्येक ताटाभोवतालची जमीन भुसभुशीत करायची, म्हणजे मग ताटं जोमानं वाढतात. त्यांना कणसं लागतात."

"कणसं लागली, की मग ती कापायची ना ?"

आजोबा म्हणाले, "अरे, लगेच कापायची नाहीत. कणसं मोठी होतात. एकेक दाणा मोत्यासारखा दिसू लागतो. ही कणसं निबर झाली, की मग कापणी करायची. सगळी कणसं खळ्यावर न्यायची. मळणी करायची. मग या दाण्यांना वारं द्यायचं."

शरदनं विचारलं, "वारं द्यायचं म्हणजे काय ?"

आजोबा म्हणाले, "खळ्यातलं धान्य सुपात घेऊन उंचावर उभं राहायचं. वारा आला की सुपातलं धान्य हळूहळू खाली सोडायचं. वाऱ्यानं धान्यातला कोंडा, कूस उडून जातं आणि मग टपोरे दाणे खाली पडतात. हे दाणे घरी आणायचे."

"की भाकरी मिळते ना ?"

आजोबा म्हणाले, "लगेच कशी भाकरी मिळेल ? हे दाणे दळायचे, त्यांचं पीठ होतं आणि त्याची भाकरी करायची."

शरद म्हणाला, "बाप रे ! बरेच कष्ट करावे लागतात की !"

आजोबा म्हणाले, "तर मग ! जमीन नांगरावी लागते, कुळवावी लागते, खत घालावं लागतं, भांगलण करावी लागते. अशी मशागत करावी, तेव्हा धान्य घरात येतं आणि म्हणून अन्न वाया जाऊ देणं योग्य नाही."

शरद म्हणाला, "आजपासून मी पानात काही टाकणार नाही."

लेखक - व. द. देसाई

❑❑❑

मराठी
बालभारती : इयत्ता ३ री
दुसरी माला : १९८२

## ८. तोडणे सोपे, जोडणे अवघड

भगवान बुद्धांच्या काळातली गोष्ट. एका घनदाट अरण्यात एक दरोडेखोर राहत होता. तो फार दुष्ट होता. लोकांना लुटणे, त्यांचा जीव घेणे याचे त्याला काहीच वाटत नसे. केवळ मजा म्हणूनदेखील तो लोकांची मुंडकी उडवी. कोणाचाही जीव घेण्यात त्याला मोठा आनंद वाटे. लोक त्याला फार घाबरत. नुसते त्याचे नाव ऐकले, तरी ते थरथर कापू लागत.

एकदा काय झाले — भगवान बुद्ध त्या भागात आले. लोकांनी त्यांना परोपरीने विनवले, ''महाराज, आपण या अरण्यातून जाऊ नका. या अरण्यात एक दरोडेखोर आहे. तो फार दुष्ट आहे. त्याला कसलीच दयामाया नाही. मागंपुढं न पाहता तो तुमचाही जीव घेईल. आपण मागं फिरावं.'' हे ऐकून भगवान बुद्धांनी मंद स्मित केले. सर्वांच्याकडे प्रसन्न दृष्टीने पाहिले आणि काही न बोलता शांतपणे ते पुढे निघाले. त्यांना अरण्यात शिरताना पाहून सगळे लोक हळहळले. त्यांना वाटले आता भगवान बुद्ध त्या दरोडेखोराच्या तावडीत सापडणार आणि तो त्यांना ठार मारणार.

थोडे अंतर चालून गेल्यावर दाट अरण्य लागले. भगवान बुद्ध त्या अरण्यातील वाटेने पुढे जात होते. इतक्यात अचानकपणे तो दरोडेखोर त्यांच्यासमोर येऊन उभा राहिला. त्याच्या हातात तळपती नंगी तलवार होती. भगवान बुद्धांना पाहून खाशी शिकार मिळाल्याचा त्याला आनंद झाला. खदखदा हसत तो भगवान बुद्धांकडे रोखून पाहू लागला. भगवान बुद्ध जराही भ्याले नाहीत, की घाबरून मागे सरकले नाहीत. आपल्या जागेवर ते निश्चल उभे होते. त्यांनी शांतपणे विचारले, ''तुला काय हवंय ?''



दरोडेखोर म्हणाला, ''तुझा प्राण !''

भगवान बुद्ध बोलले, ''माझा प्राण ? म्हणजे तू मला ठार मारणार आहेस ? बेलाशक मार ! हा मी तुझ्यापुढं उभाच आहे, पण त्या आधी माझं एक छोटंसं काम करशील का ?''

''काम ? कसलं काम ?''

भगवान बुद्ध म्हणाले, ''अगदी साधं, सोपं काम. ह्या समोरच्या झाडाची चार पानं हवी आहेत. तू तोडून आणशील ?''

''एवढंच ना ? माणसांची मुंडकी सपासप तोडणारा मी ! मला पानांचं काय ?'' असं म्हणून तो झटकन वळला आणि त्या झाडाची चार पाने तोडून घेऊन आला. त्या पानांकडे बघत बुद्ध म्हणाले, ''छान ! आता अजून एक काम कर अन् मग मला खुशाल ठार मार.''

''काय काम ते लवकर सांग.''

भगवान बुद्ध म्हणाले, ''आता एवढंच कर — ही पानं तू जिथून तोडून आणलीस, तिथंच परत जोडून ये.''

दरोडेखोर हसून म्हणाला, ''तोडलेलं पान कधी जोडता येतं का ?''

बुद्ध म्हणाले, ''मग भल्या माणसा, तोडलेलं पान जर जोडता येत नसेल, तर मग घेतलेला प्राण परत देता येईल का ? जे आपल्याला जोडता येत नाही ते आपण तोडावं कशाला ? तोडणं सोपं, जोडणं अवघड. ज्याला जोडता येत नाही त्याला तोडण्याचा अधिकार काय ?''

भगवान बुद्धांचे हे बोल ऐकून तो चपापला. 'तोडणं सोपं जोडणं अवघड' हे शब्द पुन्हा पुन्हा त्याच्या कानांत घुमू लागले. त्यापाठोपाठ आजवर कापलेली मुंडकी त्याच्या डोळ्यांपुढे येऊ

लागली. तसेच ठार केलेल्या लोकांच्या किंकाळ्यांनी त्याचे कान बधिर झाले. तो भगवान बुद्धांकडे पाहतच राहिला. प्रसन्न हसून बुद्ध म्हणाले, ''भल्या माणसा, सोपं काम करण्यात कसलं शौर्य, कसली बहादुरी ? असं काहीतरी कर, की ज्यामुळं तुलाच काय, सर्वांनाच अभिमान वाटेल.''

हे ऐकताच त्याच्या हातातील ती तळपती नंगी तलवार गळून पडली. मस्तक आपोआपच नमले. भगवान बुद्धांचे विचार त्याच्या मनावर पक्के कोरले गेले. त्या दिवसापासून लोकांना लुबाडणे, ठार मारणे त्याने कायमचे सोडून दिले.

लेखक - राम शेवाळकर



मराठी
बालभारती : इयत्ता ३ री
दुसरी माला : १९८२



# ९. दुधावरची साय

बाहेर आकाश गुदमरलेले होते. ढगांचा गडगडाटही मधून मधून ऐकायला येई. रस्त्यावरील धूळही सोसाट्याने उडत होती. पालापाचोळाही त्या धुळीच्या विमानात बसून प्रवास करत होता. रस्त्यावरची रहदारीही अत्यंत तुरळक अशी झाली होती.

इतक्यात पुन्हा एकदा आकाशात गडगडाट झाला. विजेनेही त्यातच चमक मारली आणि थाड् थाड् असा गारांचा पाऊस सुरू झाला.

उडणारी धूळ आणि तो पाऊस यांची मध्येच भेट होऊन ती खाली येत होती. त्यामुळे एक प्रकारचा सुवास येत होता. पाऊस आल्यामुळे आजूबाजूच्या घरांची खिडक्या-दारे खाड् खाड् लावली गेली.

काही मुले वडीलधाऱ्या माणसांची नजर चुकवून गारा गोळा करण्याकरिता वळचणीला पागोळ्यांच्या आड उभी होती.

पावसाच्या धारा झपाट्याने खाली येत होत्या ! गाईच्या आचळांतून दूध काढावे तसे मला वाटत होते ते !

इतक्यात भयंकर गडगडाट झाला. कुठेतरी वीज पडली वाटते. पुन्हा पाऊस सुरू झाला. पावसाचे पाणी अंगणात चांगले वीतभर साचले. त्या साचलेल्या पाण्याच्या पृष्ठभागावर पाण्याच्या थेंबांच्या सरींनीच पाऊस वाजंत्री वाजवत होता.

पुन्हा एकदा बाहेर वीज कडाडली आणि त्या वेळी घरात आई ओरडली,

''शांते, कार्टे आहेस तरी कुठं ?''

इतका वेळ पावसात गारा वेचून, परकराच्या ओच्यात काही गारा

घेऊन शांती चोरासारखी दरवाजाच्या आडोशाला उभी होती. आईला चोरून ती पावसात खेळली. तिने गारा खाल्ल्या, वेचल्या; पावसाने तिचे केस भिजले, परकर भिजला.

"शांते, कार्टे आहेस तरी कुठं ?" पुन्हा आई ओरडली, तशी थरथर कापत शांती पटकन घरात शिरली. पावसात भिजल्याने तिला हुडहुडी भरली होती आणि आई रागावेल या भीतीनेही ती कापत होती. अशा स्थितीतही गोळा केलेली एक गार तिने तोंडात टाकली.

शांती तशा स्थितीत घरात शिरली; पण आईला तिची चाहूल लागली नव्हती. आई घरातून तशीच ओरडत ओटीवर आली, "अरे, तू तरी पाहिलंस का तिला कुठं ? कुठं गेली कुणास ठाऊक !"

तोच शांती आईच्या दृष्टीस पडली. आईने शांतीकडे रागाने पाहिले मात्र, ती जास्तच घाबरली. तिने आपल्या परकराचा हातात धरलेला सोगा सोडून दिला. वेचून आणलेल्या बहुतेक गारांचे पाणी झाले होते !

"कार्टे, माझा डोळा चुकवून मरायला गेलीस का ?"

शांती माझ्या बहिणीची मुलगी. तिला आज नववे वर्ष लागले होते आणि तिच्या आईला म्हणजे माझ्या बहिणीला मरून आज आठ वर्षे झाली होती, शांतीच्या वेळी बाळंतपणाकरिता म्हणून ती जी आमच्याकडे आली, ती परत घरी न जाता परलोकातच गेली. तेव्हापासून शांती आमच्याकडे होती. ती माझ्या आईला, म्हणजे तिच्या आजीला आईच म्हणे. पोरगी मोठी गुणाची पण खोडकर होती. भयंकर अवखळ ! सकाळपासून रात्रीपर्यंत दोन-चार जिनसांची पडझड तिच्या हातून झाली नाही, असा दिवसच विरळा !

आईही तिच्यावर खूप संतापत असे. आई तिच्याशी नेहमी



त्राग्यानेच वागे. तिचे आपले एक पालुपद - माझी पोरगी मरून गेली अन् तिची ही कार्टी राहिली आहे मला छळायला मागं !

मनुष्य किती खोटे बोलत असतो प्रत्येक वेळी ! आईने हा छळ आपण होऊनच मागे लावून घेतला होता. शांतीचे वडील तिला आपल्या घरी घेऊन जायला तयार होते; पण आई कुठे पाठवायला तयार होती ? 'नको गं बाई ! माझ्या पोरीची आठवण. मी नाही तिकडं पाठवणार. काय कार्टीला मला छळायचं असेल ते छळून घेऊ दे ! माझ्या पोरीचं माझ्या हातून काही कमी झालं असेल, ते ती आता फेडून घेतेय शांतीच्या रूपानं.'

"कार्टे, माझा डोळा चुकवून पावसात कशाला गेली होतीस मरायला ?"

शांती थरथर कापत म्हणाली, "पुन्हा नाही जाणार."

"दर वेळेला तुझं हे असं आहे. काय ग ? ते दुधाचं पातेलं कुणी सांडलं ?"

"माझ्या हातून पडलं."

"पण हात कशाला लावायला गेली होतीस त्याला ?"

"तू स्वैपाकघरात नव्हतीस. मांजर खाईल म्हणून मी परकरानं उचलून ठेवायला गेले कपाटात. ते पडलं माझ्या हातून."

"बरं तर बरं. माझं नशीब बरं. अंगावर सांडून भाजली नाहीस."

शांतीने ओळखले, आता माराशिवाय आपली सुटका नाही. तिने अगोदरच रडायला सुरुवात केली; तसा आईलाही चेव आला. "कार्टे, मी मारायच्या अगोदरच का रडतेस ? थांब हो, मग मारतेच तुला तर मी."

आई उठली. तिने दोरी घेतली. "ये पाहू कार्टे इकडं !"

शांती समोर आली. आईने तिचे हात धरले.

बाहेर पुन्हा वीज कडाडली. कडाड् - लखकन प्रकाश - पुन्हा आवाज - आणि पाऊस !

''आई, मारू नको ग !''

''मग कशाला गेली होतीस पावसात ?''

''गारा वेचायला. मी तुझ्याकरिताच आणणार होते गारा गोळा करून.''

आईने हात उगारला.

का कुणास ठाऊक, शांती थोडी धीट बनली आणि थोड्याशा हळू आवाजात आईला म्हणाली, ''मला तू मारू नकोस.''

''अग, चहाटळे ! माझी पोर मरून गेली आणि तिची ही कार्टी राहिली आहे मला छळायला.'' आई पुन्हा पुन्हा तेच तेच म्हणत होती.

''तेच सांगते आई. दुधापेक्षा दुधावरच्या साईलाच जास्त जपावं लागतं.'' शांती म्हणाली.

वरील प्रश्नोत्तरे मी बाहेर बसून ऐकत होतो.

कोण, कोण सांगते आहे हे ? शांती ? नऊ वर्षांची चिमुरडी ? मलासुद्धा हे उत्तर सुचले नसते. मग शांतीने कसे दिले ?

हे काही शांतीचे उत्तर खास नव्हे. शांतीच्या तोंडून हे कोणीतरी दिले आहे.

शांतीच्या तोंडून कोण बोलणार ? दुसरे कोण ? तिची आई.

मी ओटीवर आलो आणि ओटीवरच्या खांबाला टेकून समोर पाहू लागलो. पाऊस पडत होता.

मी उघड्या डोळ्यांनी पाहत होतो. का कुणास ठाऊक, माझ्या मनाचे समाधान झाले. माझ्या डोळ्यांत पाणी आले. माझी मृत भगिनी या अफाट देखाव्यात कुठेतरी असेल, अशी कल्पना करून



त्या देखाव्यालाच मी नमस्कार केला आणि चटकन डोळ्यांत आलेले पाणी पुसून घरात आलो.

आजीच्या आणि नातीच्याही डोळ्यांतून अश्रूंचे सर ओघळत होते. दोघीही एकमेकींना निरखून पाहत होत्या. इतक्यात शांतीचा मुका घेत आई म्हणाली,. ''माझी दुधावरची साय ती !''

लेखक - य. गो. जोशी



मराठी
बालभारती : इयत्ता ४ थी
पहिली माला : १९७०

## १०. मी तुझी मुलगीच

ती एक जलपरी होती. मानवी शरीर घेऊन ती फिरायला जायची. ठरलेल्या वेळी घरी परत गेली तरच ती पुन्हा परी व्हायची. तिला आज परतायला उशीर झाला होता. ती पाण्यात शिरली, पण तिच्या मानवी शरीरात बदल झाला नाही. तिला मिळालेले पाय कायम राहिले. आता तिला निदान महिनाभर तरी या स्थितीत राहावे लागणार होते.

तिला कळून आले, आपण आता जलपरी नाही. आपल्या मैत्रिणी आपल्याला सोडून गेल्या. आता आपण एकट्या — अगदी एकट्या राहिलो. पुढच्या अमावास्येपर्यंत एकटीने राहायचे !

तिने किनाऱ्याकडे पाहिले. वाळूवर गाय व तिचे वासरू उभे होते. अतिशय व्याकूळ नजरेने ती दोघे तिच्याकडे पाहत होती. त्यांच्याकडे पाहताच जलवंतीला एकदम उमाळा आला. ती धावतच पाण्यातून बाहेर आली.

जलवंतीने गाईच्या गळ्याला मिठी मारली. वासराच्या आणि गाईच्या डोळ्यांत आपल्याविषयी किती आपुलकीची, प्रेमाची भावना आहे, हे तिला समजून आले. आपण अगदी एकट्या आहोत ही भावना चुकीची आहे, असे तिला आता वाटू लागले.

जलपऱ्या एकमेकींबरोबर खेळत, नाचत; पण त्यांच्यापैकी एखादी कोठे राहिली, गळाली तरी त्यांना कधीच खेद वाटत नसे. पूर्वी तिच्या मनावर कोणताच परिणाम होत नसे; पण आज ती माणसाप्रमाणे रडू लागली.

थोड्या वेळाने तिने आपली आसवे पुसली. वासराला थोपटले व ती किनाऱ्याकिनाऱ्याने चालू लागली. तिच्याबरोबर ती गाय व ते वासरूही चालू लागले.



काही वेळाने किनाऱ्याच्या बाजूला तिला एक झोपडी दिसली.

झोपडीमध्ये एक म्हातारी अंथरुणावर तळमळत होती. तिला ताप आला होता, उठवतसुद्धा नव्हते. झोपडीत एक मुलगी आलेली आहे, हे दिसताच तिला समाधान वाटले. ती खोल गेलेल्या आवाजात म्हणाली, ‘‘बाळ, मला थोडं पाणी दे.’’

जलवंतीने पाहिले, भांड्यात पाणी नव्हते. तिला काय वाटले कोणास ठाऊक ! तिने एकदम म्हातारीला म्हटले, ‘‘आई, यात पाणी नाही. कोठून पाणी आणायचं ते सांग. मी घेऊन येते चटकन. मला माहीत नाही कुठं पाणी आहे ते !’’

‘‘पलीकडं एक लहानसा ओहोळ वाहतो. त्याचं पाणी रोज आणते मी; पण दोन दिवस ताप आल्यामुळं मला ओहोळावर जाता आलं नाही.’’

जलवंतीने एक भांडे घेतले व ती ओहोळावर गेली.

ओहोळ खळखळ वाहत होता. त्याचे गोड संगीत सुरू होते. पाखरे गात होती. जलवंतीला वाटले, येथून हालू नये; पण तिला थांबणे शक्य नव्हते. झोपडीत म्हातारी पाण्यावाचून तळमळत होती. तिच्याकरिता आपण पाणी नेले पाहिजे, ती संकटात आहे, दुःखात आहे. तिला मदत करणे आपले कर्तव्य आहे, असे वाटू लागले.

जलवंती पाणी घेऊन आली. तिने म्हातारीला पाणी पाजले. म्हातारीला उत्साह वाटला. थोड्या वेळाने तिचा तापही उतरला. तिला घाम आला. जलवंतीने तिचा घाम पुसून काढला. म्हातारीला बराच उत्साह वाटू लागला.

जलवंतीच्या साहाय्याने म्हातारीने थोडासा भात शिजवला.

जलवंतीला म्हातारीने एका पेल्यांत दूध ओतून ते प्यायला दिले. जलवंतीला ते अमृतापेक्षाही अधिक मधुर वाटले.

दोघींनी दूधभात खाल्ला. म्हातारीला आता पुष्कळच बरे वाटू लागले. आता तिने जलवंतीची विचारपूस करायला सुरुवात केली.

''बाळ, तू कोठून आलीस ?''

''मी वाट चुकून इकडं आल्ये.''

''तुझं नाव काय ?''

''माझं नाव जलवंती.'' ती एकदम बोलून गेली.

''तुझे आईबाप कुठं असतात ?''

''मला कोणीच नाही. मी एकटीच आहे.''

''मीही एकटीच आहे, बाळ. मला मुलगा होता तो समुद्रावर मासे धरायला जात असे. एके दिवशी खवळलेल्या समुद्रानं त्याचा घास घेतला. मी म्हातारी मागं राहिले. देवानं मला नेलं असतं, तर किती बरं झालं असतं ! मी फुटक्या नशिबाची.'' म्हातारी रडू लागली.

जलवंतीने आपल्या नाजूक हातांनी म्हातारीच्या गळ्याला मिठी मारली. नंतर तिने हळूच तिचे अश्रू पुसले.

''आई, किती दुःख करणार ? होऊन गेलेल्या गोष्टीला काही उपाय आहे का ? मन आवरलं पाहिजे.'' जलवंती म्हणाली.

''बाळ, मन आवरलं पाहिजे हे मला कळतं, पण कसं आवरायचं मन ? अगदी फुटून जाऊ पाहातं हृदय !''

''मला समजतं ते आई !''

''नाही बाळ, तुला अजून कळणार नाही. मुलाच्या मृत्यूनं आईच्या हृदयावर कसा घाव बसतो ते तुला नाही कळणार.''

''का बरं मला कळणार नाही ?''



''तू आई होशील, तेव्हा आईच्या हृदयाची तुला कल्पना येईल !''

म्हातारीच्या मनाचा कढ बराच शांत झाला होता. तिने जलवंतीला आपल्या कुशीत ओढून घेतले. काही वेळ दोघीजणी स्तब्ध बसल्या.

''बाळ, तुला कोणी नाही ना ?'' काही वेळाने म्हातारी म्हणाली.

''थोड्या वेळापूर्वी मला तसं वाटत होतं ! आता नाही तसं वाटत.'' गंगामाईच्या चेहऱ्याकडे पाहत जलवंती म्हणाली.

''मलाही, तसंच वाटत होतं, पण आता मला कळलं आहे, मला एक मुलगी आहे.''

''आई, ही पाहा तुझी मुलगी ! तू माझी आई !'' गंगामाईच्या कुशीत शिरत जलवंती म्हणाली.

''बाळ, मला म्हातारीला टाकून जाणार नाहीस ना ?''

''नाही आई, मी तुला टाकून जाणार नाही.''

तिने म्हातारीच्या तोंडाकडे पाहिले. म्हातारीच्या चेहऱ्यावर समाधान दिसत होते.

लेखक - के. नारखेडे

❑❑❑

मराठी
बालभारती : इयत्ता ४ थी
पहिली माला : १९७०

## ११. नवा वसा

आटपाट नगर होतं.

तिथं भाऊ टोलेजंग वाड्यात राहत होता. बहीण राहत होती लहानशा झोपडीत. भाऊ होता श्रीमंत. बहीण होती गरीब.

भावानं एकदा मोठी मेजवानी दिली. त्यानं सगळ्यांना बोलावलं. बहिणीला बोलावलं नाही. बहिणीला वाटलं, घाईगर्दीत भाऊ विसरला असेल. आपल्या भावाच्याच घरचं जेवण आहे. आमंत्रण नसलं म्हणून काय झालं ? कशाला बघायची आमंत्रणाची वाट ? इतके लोक येणार, आपणही जावं.

रंगीबेरंगी पताकांनी आणि फुलांच्या माळांनी टोलेजंग वाडा सजवला होता. स्वतः भाऊ दारात हात जोडून उभा होता. येणाऱ्यांचं हसून अगत्यानं स्वागत करत होता. 'या, बसा.' म्हणत होता.

सगळे लोक आले. जेवणासाठी पाटांवर येऊन बसले. बहीण मात्र कोपऱ्यातच उभी. सगळे जेवणाच्या गडबडीत. कुणाचं तिच्याकडं लक्षच नव्हतं. भावाची नजर आपल्याकडं आता जाईल, मग जाईल, असं तिला वाटलं.

पण भावानं पाहूनही न पाहिल्यासारखं केलं.

बहीण हिरमुसली.

पक्वान्नांचा घमघमाट येत होता. कुणीच तिच्याकडं बघत नव्हतं. वाट पाहून पाहून बहीण थकली. कुणीच बोलावत नाही, असं पाहून ती तिथंच एका रिकाम्या पाटावर बसली. घास घेणार, तोच भावाची तिच्याकडं नजर गेली.

''कोण ग तू ? इथं कशाला आलीस ?'' त्यानं विचारलं.

''दादा, मला नाही ओळखलंस ? मी तुझी बहीण.''



''बहीणबिहीण ओळखत नाही. तुला काही मी आमंत्रण दिलं नाही.''

''आपलंच घर म्हणून आलेय. घरच्या माणसानं का आमंत्रणाची वाट बघत थांबायचं ? घरच्यांशी कसला मानपान ?''

''तू दळभद्री आहेस. माझे मित्र मला हसतील. त्यांचे भरजरी कपडे बघ. नाहीतर तुझे — नुसत्या चिंध्याच !''

''असू दे, दादा. मला नाही त्याचं काही वाटत.''

''अग, पण माझा अपमान होतो. ऊठ आधी.''

एवढ्यात पंगतीतला एकजण म्हणाला, ''भरल्या ताटावरून असं कुणाला उठवू नये.''

बहिणीला वाईट वाटलं. ती खट्टू झाली. न बोलता, न जेवता बिचारी घरी गेली.

तिच्या मनात एकच विचार सुरू झाला — 'हे असं का ?'

शेजारणीला पुसलं. थोरामोठ्यांना विचारलं — असं का घडावं ? भावानं असं का करावं ?

कुणीतरी सांगितलं, ''बाई, बाई, दळिद्र गेलं पाहिजे. दिवस पालटले पाहिजेत.''

''दळिद्र कसं जाईल ?''

''बाई, बाई, वसा घे.''

''कसला वसा घेऊ ?''

''वसा घे कामाचा. वसा घे श्रमाचा. रिकामं कधी बसायचं नाही. आळसात वेळ घालवायचा नाही. घेतला वसा टाकायचा नाही. दिला शब्द मोडायचा नाही.''

बहिणीनं वसा घेतला. रिकामी कधी बसली नाही. दिवसा झोप घेतली नाही. आळस टाकून कामाला लागली.

दिसामाशी स्थिती पालटली. गरिबी गेली. घराला नवी कळा आली. घर धनधान्यानं भरून गेलं. मुलंमाणसं सुखावली. पैपाहुणे येऊ लागले. लोक मानानं बोलवू लागले.

एक दिवस भाऊही घरी आला. मनमोकळं बोलला, हसला. अगत्यानं भोजनाचं निमंत्रण देऊन गेला.

बहीण येणार म्हणून वाडा सजवला. केळीची पानं. पानांपुढं रांगोळी. रंगीत सुंदर पाट. उदबत्तीचा घमघमाट. काय वर्णावा थाट !

भाऊ दारात उभा होता. बहीण दिसताच पुढं झाला. हसतमुखानं स्वागत केलं.

बहीण आत आली. न बोलता उभी राहिली. जुना प्रसंग आठवला.

ती पाटाजवळ गेली. सरी काढली, पाटावर ठेवली. कंठा काढला, पाटावर ठेवला. गोठ काढले, पाटावर ठेवले. पाटल्या काढल्या, पाटावर ठेवल्या. तोडे काढले, पाटावर ठेवले. कुडी काढली, पाटावर ठेवली. नथ काढली, पाटावर ठेवली.

भाऊ म्हणाला, ''ताई, ताई, हे काय करतेस ?''

ऐकलं न ऐकलंसं करून ती एकेक घास दागिन्यांवर ठेवू लागली. लाडवाचा घास सरीवर, जिलबीचा घास गोठावर, पुरणाचा घास नथीवर...

भावाला काही कळेना. तो म्हणाला, ''ताई, जेव ना.''

''हो, तेच करतेय ना. तू ज्यांना जेवायला बोलवलंयस. त्यांना आधी भरवते.''

भाऊ गोंधळला. त्याला काही कळेना.

बहीण म्हणाली, ''भाऊराया, तू मला नाही बोलावलंस, बोलवलंयस या दागिन्यांना — माझ्या श्रीमंतीला.''

भाऊ ओशाळला. कसाबसा म्हणाला, ''ताई, ताई, मला माफ कर. मागं मी चुकलो. आता मी शिकलो. पुन्हा असं वागणार नाही. कुणाला कमी लेखणार नाही.''

बहीण म्हणाली, ''अरे, माणसाचे दिवस सारखेच नसतात. त्या दिवशी तुझ्याकडं धडा शिकले. कामाला लागले आणि दिवस पालटले.''

भाऊ म्हणाला, ''ताई, ताई, चांगलं केलंस. माझ्या डोळ्यांत अंजन घातलंस. आजपासून वसा घेईन. तुझा वसा सर्वांना सांगेन. म्हणेन, ''उतू नका, मातू नका. कामाचा आळस करू नका. खोटा गर्व धरू नका. माणुसकीला विसरू नका. कोणाला हीन लेखू नका.''

लेखक - राजा मंगळवेढेकर

❑❑❑

मराठी
बालभारती : इयत्ता ४ थी
दुसरी माला : १९८३

## १२. माया

सात-आठ वर्षांची झिनी आज पहाटे उठली नाही. तिला बरे नव्हते. एरवी ती पहाटेच उठायची. गोळा केलेल्या काटक्या पेटवायची. मातीच्या वाडग्यात तीन-चार कप पाणी ठेवायची आणि बकरीचे दूध काढायला जायची. अंगणात एक बसकट काटेरी झुडूप होते. त्याच्या बुंध्याला नारळाच्या दोरीने शेळी बांधलेली असायची नि तिच्या शेजारीच एक गोजिरवाणे पिलू असायचे. त्या पिलाला आई नव्हती. ही शेळी त्या पिलाला पाजायची, चाटायची, बरोबर चरायला न्यायची. तेही सारखेंसारखे तिच्या पायापायांत घुटमळायचे. त्याच्या आईनेही केले नसते, एवढे प्रेम ती शेळी करायची त्या पिलावर. म्हणतात ना, 'माय मरो नि मावशी जगो.'

झिनीचा त्या पिलावर खूप जीव होता. ती त्याला खांद्यावर घ्यायची, मांडीवर झोपवायची. रोज ढोरे चरायला नेली, की त्या पिलामागेच असायची. पिलाला ती 'पिठी' म्हणायची. भाकरीच्या पिठासारखी पांढरी आणि गोंडस होती ती. पिठी एखादे दिवशी दूध प्यायची नाही. बसूनच राहायची, नुसती कोठेतरी पाहत, उगीचच तोंडात नसलेला चारा चावत. मग झिनी म्हणायची, ''आईची आठवण झाली असेल तिला.'' झिनीला तरी कुठे होती आई ? पण तिचा बाप गेनू तिला खूप लाडाने वागवायचा. तिला आईची आठवणच होऊ द्यायचा नाही.

झिनी आणि पिठी अगदी एकजीव होत्या जणू. पिठी दूध प्याली नाही, तर झिनीही भाकरी खायची नाही.

आज झिनीला बरे नव्हते. ती पहाट झाली, तरी बाहेर आली



नाही. पिठीच्या पाठीवरून तिचा हात फिरला नाही. पिठी दूध प्यालीच नाही. मधूनच दबक्या आवाजात 'ब्यँ ब्यँ' करायची. झिनीने मग पडल्या पडल्या झोपडीतूनच पिठीला आवाज दिला आणि पिठी उड्या मारत झोपडीत आली. झोपलेल्या झिनीच्या तोंडाला तिने तोंड लावले आणि क्षणभर ती झिनीकडे पाहत राहिली.

बाजूला एका फाटक्या सुपात तरोट्याची भाजी पडलेली होती. त्यातली काही कोवळी कोवळी पाने झिनीने हात लांब करून उचलली आणि पिठीला खाऊ घातली. पिठीने ती भरभर जबड्यात भरून घेतली. झिनीला खूप आनंद झाला. पिठीदेखील तुडुक तुडुक उड्या मारत झोपडीभर फिरली आणि पुन्हा झिनीजवळ येऊन उभी राहिली. झिनीचा आखूड मळकट झगा तिने तोंडात धरून ओढला. झिनीने तो हळूच सोडवून घेतला. आधीच फाटला होता तो कुठे कुठे.

तेवढ्यात बापाने झिनीला हाक मारली. झिनी उठली. बाहेर जाऊन मातीत गाडलेल्या रांजणातले पाणी तिने एका टिनपाटाने बाहेर काढले. चूळ भरली. तोंडावरून हात फिरवला. पिठी ते सगळे न्याहाळत होती. मध्येच झिनीच्या पायात जाऊन उभी राहत होती.

आज झिनीच्या बापानेच ढोरे चरायला नेली. ती शेळी आणि पिठीही चरायला गेल्या. झिनीला दिवसभर काय करावे ते सुचेना. पिठी चरायला गेलेली. तिला करमेना. ती संध्याकाळकडे डोळे लावून बसली होती.

पहाडात दिवस लवकर बुडतो. ती पिठी गेल्याच्या वाटेकडे आता दूरदूर पाहत होती. ढोरे दिसली. तिचा बापही दिसला. तिला खूप हुरूप आला. छोटीशी पिठी कुठून दिसणार दुरून ?

पण छे ! ती जवळूनही दिसली नाही. सगळी ढोरे आपापल्या वाटेने पांगली. शेळीदेखील झुडपाशी येऊन उभी झाली. गवती छपरावर काठी टाकून गेनू झिनीजवळ आला, पण पिठी कुठेय ? झिनी कावरीबावरी झाली.

"पिठी कुठंय ?" तिने बापाला विचारले.

"आज कुठंतरी भटकली ती. दिवस कलला, तेव्हा तिले खूप धुंडलं म्या, पन दिसलीच नाही !" बापाने सहज सांगितले.

पण झिनीने लगेच गळा काढला.

"वाघानं खाल्ली असंन का ?" तिने बापाला जोरात प्रश्न केला आणि जंगलात जाणाऱ्या त्या वाटेकडे धावत सुटली.

बाप गोंधळला. झिनीचे पिठीवरचे प्रेम त्याला ठाऊक होते. तो झिनीमागे धावला. इवल्याशा झिनीला पकडून त्याने कडेवर घेतले.

"आता अंधारात कशी दिसंन पिठी ? उद्या पहाटेसच जाईन मी तिले शोधायले."

झिनीने रडून रडून आकांत केला. बापाने खूप खूप समजावले; पण उपयोग झाला नाही. झिनी जेवली नाही. रडून रडून थकली आणि केव्हातरी तिचा डोळा लागला.

झिनीचा बाप पहाटेस उठला. जंगलात गेला. पिठीला दऱ्याखोऱ्यांत शोधू लागला. फिरता फिरता सूर्य डोक्यावर आला. घामाने गेनू डबडबून निघाला, पिठी कुठेच दिसेना. आज भाकरही नव्हती. तो थकून गेला. एका दरीच्या उंच टोकावर मोहाच्या झाडाखाली टेकला आणि पुढे दरीत पाहतो, तर काय, पिठी उभी होती एका दगडावर. झिनीच्या बापाला खूप आनंद झाला. तो धावत अर्धी दरी उतरला; पण एकदम थबकला. पिठीसमोरच्या दाट झुडपाआड वाघीण उभी होती. ती पिठीकडेच पाहत होती. तिचे



क्रूर डोळे पाहून झिनीचा बाप जागीच थिजला. पिठी खालच्या आवाजात 'ब्यँ ब्यँ' करत पुढे सरत होती. वाघिणीच्या ती अगदी जवळ गेली.

वाघिणीने घशातल्या घशात 'गुर्र गुर्र' आवाज केला. पिठीने आपले तोंड उंचावून वाघिणीच्या तोंडाला लावले आणि एकदा नव्हे तर दोनदा, तीनदा. मग वाघीण जरा जोरानेच गुरगुरली आणि झिनीच्या बापाने एकदम डोळे मिटले. संपले पिठीचे आयुष्य. डोळ्यापुढे झिनी दिसली. पिठीसाठी आक्रोश करणारी झिनी.

पण इलाज नव्हता. क्षणार्धात त्याने डोळे उघडले आणि पाहतो तर काय ! वाघीण तिथे नव्हती. त्याने दूरवर इकडे तिकडे पाहिले. वाघीण कुठेच दिसत नव्हती. पिठी मात्र वाघीण उभी होती त्या दिशेला पाहत दबक्या आवाजात 'ब्यँ ब्यँ' करत होती.

झिनीचा बाप धावतच दरीत उतरला. निरागस पिठीला त्याने एकदम कवेत घेतले. छातीशी घट्ट धरले. छातीशी झिनीच होती जणू. झिनीच !

❑❑❑

मराठी
बालभारती : इयत्ता ४ थी
तिसरी माला : १९९२

## १३. न्याय

जुम्मन शेख आणि अलगू चौधरी हे एकमेकांचे जिवलग मित्र. भले त्यांचे धर्म वेगवेगळे असोत; पण मैत्री अगदी गाढ होती.

जुम्मन शेखच्या धाकात सारा गाव होता; आणि अलगू चौधरीच्या घरी श्रीमंती पाणी भरत होती.

जुम्मन शेखची एक म्हातारी मावशी होती. तिला मूलबाळ कोणी नव्हते. तिचा थोडासा पैसाअडका, जमीनजुमलाही होता. जुम्मन शेखने म्हाताऱ्या मावशीची ही जायदाद स्वतःच्या नावाने करून घेतली. ती ताब्यात येईपर्यंत त्याने मावशीची खूपच काळजी घेतली. तिची खूप सेवा केली; पण मग मात्र सगळा मोहरा फिरला. मावशीबाईंची सेवा करणे त्याने हळूहळू सोडून दिले. तिला दोन वेळच्या जेवणाबरोबर झणझणीत तिखट बोलणीही ऐकायला मिळू लागली.

काही दिवस म्हातारीने हाल सोसले; पण पुढे पुढे जुम्मनच्या बायकोचा जाच तिला सोसवेनासा झाला. एक दिवस तिने धीर करून म्हटले, ''बाळा, तुमच्या दोघांच्या संसारात माझं म्हातारीचं पटेल असं काही वाटत नाही. तू आपला मला दरमहा खर्चाला थोडे पैसे देत जा, म्हणजे मी माझी वेगळी राहत जाईन.''

जुम्मनने मावशीचे हे बोलणे ऐकले आणि तिला निलाजरेपणाने म्हणाला, ''अरे वा ! रुपये काय झाडाला लागतात होय ?''

म्हातारीची सहनशीलता आता मात्र संपली. तिने जुम्मनला म्हटले, ''मी तुझी ही करणी पंचायतीसमोर मांडेन बरं पोरा !'' पण जुम्मनला पंचायतीची भीती नव्हती. ''खुशाल बोलाव पंचायत,'' तो म्हणाला. कारण सारा गाव त्याच्या मुठीत ! त्याच्याशी शत्रुत्व



कोणाला परवडणार ?

म्हातारी मावशी गावभर हिंडली. तिचे दुःख ऐकून लोक हळहळले; पण तिच्यासाठी जुम्मनशी वैर करायला कुणीच तयार झाले नाही. म्हातारी शेवटी अलगू चौधरीकडे येऊन म्हणाली, ''तू जरा चल बेटा. चल पंचायतीत.''

''मी येऊन काय करू मावशी ? जुम्मन माझा मित्र आहे. मी तुझ्या बाजूनं बोलून त्याच्याशी वाकडं घेणार नाही,'' अलगूने उत्तर दिले. म्हातारीने क्षणभर त्याच्याकडे पाहिले आणि म्हणाली, ''अरे पोरा, वैराच्या भीतीपायी तू सत्यसुद्धा सांगणार नाहीस ? तुझ्यात देव आहे की नाही ?''

म्हातारी उठून गेली; पण तिचे ते शब्द मात्र अलगूला सारखे आठवत राहिले. संध्याकाळी झाडाखाली पंचायत भरली. म्हाताऱ्या मावशीने आपली कर्मकथा लोकांसमोर मांडली आणि म्हणाली, ''मला न्याय द्या. पंच परमेश्वर असतो. मी पंचाचा निर्णय मानीन.''

जुम्मनचा एक मित्र रामधन मिश्र म्हणून होता. त्याने जुम्मनला विचारले, ''बोल जुम्मन पंच कोण असावा ?'' ''कुणीही चालेल. म्हातारी निवाडा करेल तो पंच मला चालेल.'' बेफिकिरीनं जुम्मनने उत्तर दिले.

मावशी म्हणाली, ''तुझा मित्र अलगू चौधरीच पंच बनेल.''

अलगू चौधरी म्हातारीचे बोलणे ऐकून घाबरला. तो सगळ्यांसमोर म्हणाला, ''मावशीबाई, तुला तर माहीत आहे आमची मैत्री. उगाच मला कशाला पंच नेमतेस ?''

पण म्हातारी गंभीरपणे म्हणाली, ''हे बघ अलगू, पंचाच्या मनात देवच असतो असं मी मानते. मैत्रीखातर कुणी सत्य विकत

नाही समजलास ? तू बोल. तुझ्या तोंडून देवच बोलेल.''

आणि अलगू चौधरी पंच झाला. दोन्ही पक्षांनी आपले म्हणणे पंचासमोर मांडले. अलगूने निवाडा केला, ''म्हाताऱ्या मावशीबाईला जुम्मन शेखने दरमहा खर्चाची रक्कम देत जावी आणि जर हा निवाडा मंजूर नसेल तर म्हातारीची मालमत्ता तिला परत दिली जावी.''

निवाडा ऐकला आणि जुम्मन एकदम हबकला. काल-परवापर्यंत आपल्या जिवाचा जिवलग असलेला मित्र अशा रीतीने आपल्या विरोधी निवाडा करून आपली अब्रू वेशीवर टांगेल, असे त्याला मुळीच वाटले नव्हते. तो मनातून संतापला. मग त्या दिवसापासून दोघांच्या मैत्रीला आपोआप ओहोटी लागली आणि जुम्मन अलगूचा सूड घेण्याची संधी शोधत राहिला.

अन् तशी संधी लवकरच आली. काय झाले, की वर्षापूर्वी अलगू चौधरीने एक सुंदर बैलजोडी विकत घेतली होती. अतिशय उत्तम जातीचे बैल होते. त्यातला एक बैल अचानक मेला.

आता जोडीतल्या दुसऱ्या बैलाचा काय उपयोग ? गावातल्याच एका एक्केवाल्याला अलगूने दुसरा बैल विकून टाकला. एक महिन्याने पैसे चुकते करायच्या बोलीवर त्याने बैल विकत घेतला. नवीन दमदार बैल ! एक्केवाल्याला मग भान राहिले नाही. जिथे पूर्वी गुळाच्या ढेपा लादून बाजाराची दिवसाला एक खेप व्हायची तिथे चार-चार खेपा होऊ लागल्या. बिचारे जनावर ! महिन्याच्या आतच रस्त्यात मरून पडले.

अलगू महिन्याभराने पैसे मागायला गेला तेव्हा एक्केवाल्याने सरळ त्याला हाकलून दिले. ''आम्हांला फसवलं, अर्धमेला बैल गळ्यात बांधला आणि वर पैसे मागतोय !'' भांडणं वाढत गेले.



शेवटी पंचायतीसमोर निवाडा करायचे ठरले.

संध्याकाळच्या वेळी पंचायत बसली तेव्हा रामधन मिश्राने विचारले, ''सांग अलगू चौधरी, पंच कोण ?''

''एक्केवाला सांगेल तो पंच,'' अलगूने उदारपणे म्हटले.

''तर मग माझा पंच जुम्मन शेख,'' एक्केवाल्याने म्हटले.

अलगू चौधरीचा चेहरा एकदम उतरला. त्याला पूर्वीच्या पंचायतीची आठवण झाली. जुम्मन आता त्या जुन्या घटनेचा बदला घेणार, याविषयी त्याला शंका उरली नाही.

जुम्मन शेख शांतपणे पंच म्हणून समोर येऊन बसला खरा, पण त्याचे मन त्याला म्हणू लागले — 'हे पद जबाबदारीचं आहे. गड्या रे, सत्य जे असेल, तेच तुला सांगितलं पाहिजे. पंच म्हणजे परमेश्वर. आता या पदावर बसलास की वैर नाही नि दोस्ती नाही.'

पंचापुढे एक्केवाला आणि अलगू यांनी आपापली बाजू मांडली. अखेर जुम्मन शेखने पंच म्हणून निवाडा केला, ''बैलाची किंमत अलगू चौधरीला दिली गेली पाहिजे. बैल विकला गेला तेव्हा तो उत्तम होता. निरोगी होता. तेव्हा तो का आणि कसा मेला याच्याशी मूळ मालकाचा संबंध पोहोचत नाही.''

पंच बनलेल्या जुम्मन शेखच्या तोंडचे हे वाक्य ऐकले आणि अलगू चौधरी आनंदाने ओरडला, ''पंच परमेश्वराचा विजय असो !''

पंचायत उठली. लोक आपसांत म्हणत होते, ''याला म्हणतात न्याय. पहा, पंचामध्ये देव असतो म्हणतात ते खोटं नाही !''

जुम्मन शेख उठून अलगू चौधरीजवळ गेला आणि म्हणाला, ''मित्रा, तू माझा निवाडा केलास तेव्हापासून मी तुझा वैरी बनलो होतो; पण आज मला कळलं, पंचाच्या गादीवर जो बसतो त्याला

कुणी शत्रू नसतो की मित्र नसतो. न्यायाशिवाय त्याचं नातं दुसऱ्या कुणाशीही नसतं. आज मला कळलं पंच परमेश्वर का असतो ते !''

जुम्मनचे हे बोलणे ऐकले आणि अलगू चौधरीच्या डोळ्यांत पाणी आले. दोघेही मित्र एकमेकांना कडकडून भेटले.

लेखक - मुन्सी प्रेमचंद
(अनुवादित)



मराठी
बालभारती : इयत्ता ४ थी
तिसरी माला : १९९२



## १४. हसन-गंगू

फार फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. दिल्लीत एक ब्राम्हण राहत होता. त्याचे नाव होते गंगू. त्याकाळी दिल्लीचा बादशहा नसिरूद्दिन होता. गंगू ब्राम्हण नसिरूद्दिनच्या दरबारात जात-येत असे. बादशहा आणि त्याचे दरबारी त्याचा खूप सन्मान करत असत.

गंगू ब्राम्हणाच्या घरी एक नोकर होता. त्याचे नाव होते हसन. तो गरीब होता; पण फार प्रामाणिक व कष्टाळू होता. दिवसभर तो शेतात काम करायचा. त्याला जो पगार मिळायचा, त्यातच त्याचा उदरनिर्वाह होत असे.

तो एकदा शेतात नांगर चालवत होता. मध्येच त्याचा नांगर जमिनीत एका ठिकाणी रुतून बसला, तेव्हा तो तिथेच थांबला. त्याखालील जमीन खणून पाहिली, तर तेथे एक हंडा दिसला. हंडा बाहेर काढून पाहिला, तर तो मुद्रांनी भरलेला होता. एवढे अमाप धन पाहून त्याला अत्यानंद झाला; परंतु लगेच त्याच्या मनात एक विचार आला, की हे धन तर गंगूच्या शेतात सापडले आहे, म्हणजे या धनावर त्याचा अधिकार आहे. हा विचार मनात येताच ते सर्व धन घेऊन तो आपल्या मालकाकडे गेला आणि त्याने आपल्या मालकाला सर्व हकीगत सांगितली, तेव्हा गंगू आपला नोकर हसनचा प्रामाणिकपणा पाहून फार खूश झाला.

हसनच्या इमानदारीचा उल्लेख गंगूने बादशहासमोर केला. बादशहा फार प्रभावित झाला आणि त्याला आपल्या दरबारात नोकरी दिली. दरबारातसुद्धा तो अतिशय मेहनतीने व प्रामाणिकपणे काम करत असे.

काही दिवसांनंतर बादशहाने त्याला दख्खनचा सुभेदार बनवले. तेथेही त्याने लोकहिताची अनेक कामे केली; म्हणून प्रजा त्याच्यावर फार खूश झाली.

काही दिवसांनंतर तो स्वत: दख्खनचा बादशहा बनला. बादशहा बनल्यानंतरही तो आपल्या मालकाला विसरला नाही. त्याने आपल्या नावाबरोबर मालकाचे नावही लावले, म्हणजे आपल्या नावातच मालकाचे नाव मिळवले. म्हणून तो हसन-गंगू या नावाने संबोधला जाऊ लागला. या गोष्टीला कित्येक वर्षे लोटली; पण आजही लोक हसनला त्याच्या सचोटी व प्रामाणिकपणा या गुणांमुळे आठवतात.

लेखक - मकतबा इस्लामी
मराठी अनुवाद - सौ. सईदा आय. इनामदार



उर्दू
बालभारती : इयत्ता २ री
पहिली माला : १९६९



# १५. निर्भय मुलगा

कोकणपट्टीतील रत्नागिरी हा निसर्गरम्य असा जिल्हा. या रत्नागिरी जिल्ह्यात 'रेलगाव' नावाची एक छोटीशी वस्ती आहे. सुधीर हा रेलगावचा राहणारा आहे. ६ नोव्हेंबर, १९८० ची ही गोष्ट आहे. सुधीर शाळेतून परत येत होता. त्याचे सर्व वर्गमित्र केव्हाच घराकडे निघाले होते. सुधीर आपल्या विचारात मग्न होऊन एकटाच शांतपणे चालला होता.

संध्याकाळचा थंड वारा शरीराला सुखद वाटत होता. सूर्य डोंगरामागे अस्ताचलाकडे कलला होता. पशू-पक्ष्यांनी आपापल्या घराची वाट धरली होती. पाखरांची किलबिल सुधीरच्या कानी पडत होती. सुधीर शांतपणे एकेक पाऊल टाकत आपल्या घराच्या दिशेने जात होता. इतक्यात त्याला थोड्या दूरवरून धुराचे लोट उठताना दिसले.

सुधीर लगबगीने धुराच्या दिशेने पळत सुटला. ते धुराचे लोट एका झोपडीतून निघत होते. झोपडीने पेट घेतला होता. पुष्कळ माणसे झोपडीभोवती जमली होती. झोपडीच्या आत अडकलेली मुले आरडाओरड करत रडत होती.

सुधीरने आपले दप्तर भिरकावून दिले व तो पुढे सरसावला. दारासमोर येऊन त्याने दार उघडण्याचा प्रयत्न केला; परंतु दार आतून बंद होते. झोपडीच्या दाराला त्याने जोरदार धक्का दिला, त्याबरोबर दार मोडून खाली पडले. सुधीरने आत डोकावून पाहिले, तर त्याला एक लहान मुलगा जमिनीवर बेशुद्ध पडलेला दिसला. सुधीरने लगेच त्याला खांद्यावर उचलून घेतले व तो झोपडीच्या बाहेर आला. त्याने त्या लहान मुलास जमिनीवर ठेवले. झोपडीतून

अजून कोणा मुलाच्या रडण्याचा आवाज त्याच्या कानी पडला.

सुधीर पुन्हा त्या झोपडीकडे धावला. आता तर आगीने चांगलाच पेट घेतला होता. झोपडी चारही बाजूंनी आगीच्या भोवऱ्यात सापडली होती; त्यामुळे सुधीरला काही दिसत नव्हते. त्याच्या कानी फक्त त्या लहान मुलाचे रडणे ऐकू येत होते. त्याच्या मनात एकच विचार चालला होता, की कोणत्या प्रकारे मुलाला आगीतून वाचवता येईल ?

तो झोपडीत शिरला. तेथे त्याला एक लहान मुलगा चटईवर बेशुद्ध पडलेला दिसला. त्याच्या बाजूला एक लहान मुलगी रडत बसली होती.

सुधीरने क्षणात मुलाला उचलून घेतले व मुलीचा हात धरून तिला ओढतच तो झोपडीच्या बाहेर पडला. त्याच क्षणाला पेट घेतलेली झोपडी खाली पडली. थोडासाही विलंब झाला असता, तर सुधीर व दोन्ही मुले आगीत जळून मृत्युमुखी पडली असती.

अशा प्रकारे निर्भय सुधीरने आपल्या शौर्याने तीन लहान मुलांचे प्राण वाचवले. या निर्भय मुलाने जे काम केले, ते मोठमोठ्यांना करणे अशक्य आहे.

भारत सरकारने सुधीरला राजधानी दिल्ली येथे बोलावून या शौर्याबद्दल 'शौर्य पुरस्कार' प्रदान केले.

लेखक - बी. ए. अन्सारी
मराठी अनुवाद - शेख रशिद मो. युसुफ

❑❑❑

उर्दू
बालभारती : इयत्ता ३ री
दुसरी माला : १९८२



# १६. आपापला वाटा

एक होता रामू. तो मजुरी करत असे. त्याचे लहान कुटुंब होते. त्याच्या कुटुंबात त्याची पत्नी कमला आणि दोन मुलगे होते. मोठा मुलगा हरी सोळा-सतरा वर्षांचा होता. तो वडलांच्या कामात हातभार लावत असे. धाकटा राजू पाच वर्षांचा होता. तो दिवसभर काळूबरोबर खेळत राहायचा. काळू त्यांचा पाळलेला कुत्रा होता.

काही दिवसांपूर्वी रामू आपल्या कुटुंबासह गाव सोडून शहरात मजुरी करण्यासाठी आला. एका इमारतीचे बांधकाम चालू होते, तिथे त्याला काम मिळाले. ठेकेदाराने त्याला तिथे राहण्याची परवानगी दिली होती. त्याचा एक उद्देश होता, की तो तेथे बांधकामासाठी पडलेल्या विटा, सिमेंट आणि लोखंडी गजांची देखभाल करील.

एक दिवस त्या शहरात काही कारणामुळे संचारबंदी लागू झाली. सर्व कामकाज बंद पडले. रोजंदारी मजुरांनी कामावर येणे बंद केले. एक आठवडा झाला. रामूने साठवून ठेवलेले धान्य आता संपत आले होते. रामूच्या बायकोने त्या दिवशी पिठाचा डबा साफसूफ करून, होते ते सारे पीठ गोळा केले आणि कशाबशा चार लहान लहान भाकऱ्या केल्या. वाळलेल्या दोन-चार मिरच्या होत्या. थोडे मीठ टाकून त्यांची तिने चटणी बनवली. कमलाने सगळ्यांना एक-एक भाकरी आणि चटणी दिली. त्यांच्याबरोबर कोपऱ्यात बसलेला काळू कुत्रा आपल्या हिश्शाची वाट पाहत होता; पण भाकऱ्या फक्त चारच होत्या आणि सगळ्यांना भूक तर चांगलीच लागली होती. इतक्यात राजू म्हणाला, ''आई, एका भाकरीत पोट कसे काय भरणार ?''

"नाही भरले, तर मी माझी भाकरी देईन आपल्या छोट्या राजूला." आईने राजूच्या गालावरून प्रेमाने हात फिरवत सांगितले.

"संचारबंदी नसती, तर मी काहीतरी करून डाळ-भाताची सोय केली असती." रामू उसासा सोडत म्हणाला.

"कोणास ठाऊक ही संचारबंदी केव्हा हटणार ते ?" कमल नाराजीने म्हणाली.

"बापू, ही संचारबंदी म्हणजे काय हो ?" राजूने भोळसटपणे विचारले.

"आता कसं सांगू तुला ? असं समज, की माणसांच्या हिंडण्या-फिरण्यावर एक प्रकारे बंधन लादले गेले आहे."

"बंधन म्हणजे काय बापू ?" राजूने विचारले.

"बंधन म्हणजे या काळात कोणालाही बाहेर जाण्या-येण्याची परवानगी नसते."

"पण ही संचारबंदी का लावण्यात येते ?" राजूने कुतूहलापोटी विचारले.

"राजू, आता तू आधी जेव आणि गुपचूप झोप पाहू." रामूने त्याच्या प्रश्नाचे उत्तर देण्याचे टाळले.

"ठीक आहे; पण माझा काळू काय खाणार ? त्याला खायला भाकरी नाही मिळाली." राजूच्या बोलण्यावर एक क्षण सगळे गप्प झाले.

"तू जेवून घे. कुत्र्याचे काय, तो कुठेही जाऊन आपले पोट भरेल." आई राजूला समजावत म्हणाली.

सगळ्यांनी आपापल्या ताटाकडे हात नेला; पण कुत्र्यासमोर खाणे बरे वाटत नव्हते. कुत्र्याने त्या सर्वांकडे एका वेगळ्या नजरेने बघितले. इतक्यात कसलीतरी चाहूल लागली. तसा कुत्रा गुरगुरत



बाहेर पडला. बाहेर खूप अंधार होता.

दोन-चार वेळा भुंकून कुत्रा आत परतला. काही क्षण सर्वांसमोर शेपूट हालवत तो उभा राहिला. नंतर आपल्या नेहमीच्या जागी जाऊन बसला.

दिव्याच्या धूसर उजेडात सगळ्यांनी एकमेकांकडे बघितले, नंतर कुत्र्याकडे बघितले. तो पोटात डोके खुपसून झोपण्याचा प्रयत्न करत होता. कोणाचेही मन जेवणाकडे नव्हते. राजू तसाच ताटावरून उठला. ताटातील आपली भाकरी उचलली. त्याचे चार भाग केले आणि चतकोर भाकरीचा तुकडा कुत्र्याला टाकून म्हणाला, "घे काळू, तू तरी खा. रिकाम्या पोटी झोपणं बरं नाही."

सगळ्यांचे चेहरे खुलले. त्यांनीही आपापल्या ताटातील भाकरीचा चतकोर भाग कुत्र्यासमोर टाकला. सर्वांना बरे वाटले. आता कोणाच्याही मनावर दडपण नव्हते.

लेखक - एम. नदीम
मराठी अनुवाद - मोमिन शैहला

❑❑❑

उर्दू
बालभारती : इयत्ता ४ थी
चौथी माला : १९९८

# १७. पाच रुपयाचा शिक्का

अस्लमचे वडील विद्यार्थिदशेत एक चांगले खेळाडू होते. त्यांनी विविध खेळांच्या सामन्यांत तऱ्हेतऱ्हेच्या सुंदर ढाली, अनेक लहान-मोठे कप आणि चमचम करणारे बिल्लेदेखील जिंकले होते. ते एका मोठ्या कपाटात नीटनेटकेपणाने सजवून ठेवले होते; पण कपाटाचा वरचा खण मुद्दामच रिकामा ठेवला होता. त्यांची महत्त्वाकांक्षा होती, की त्यांचा मुलगा अस्लमही आपल्यासारखाच प्रसिद्ध खेळाडू होऊन विविध स्पर्धांतील पारितोषिके मिळवेल नि ती त्या वरच्या खणात ठेवेल.

कपाटामध्ये सजवून ठेवलेल्या पुरस्कारांना बघून अस्लमच्या मनातही इच्छा निर्माण व्हायची, की मीही आपल्या वडिलांसारखा चांगला खेळाडू होईन आणि खूप खूप पारितोषिके मिळवीन.

एके दिवशी शाळेत मुख्याध्यापकांनी जाहीर केले, की यंदा स्वातंत्र्यदिनानिमित्त शेजारच्या गावात पोहण्याच्या स्पर्धेचे आयोजन केले जाईल. त्यात आसपासच्या गावांतील शाळकरी मुले भाग घेतील. आपल्या शाळेतील विद्यार्थीही या स्पर्धेत सहभागी होतील. हे ऐकून अस्लमने विचार केला, की जर मीही चांगला पोहणारा असतो, तर या स्पर्धेत सामील झालो असतो. त्याने ही बातमी आपल्या वडिलांना सांगितली. ते म्हणाले, ''मी तुला पोहायला शिकवीन, तू या स्पर्धेत जरूर भाग घे.''

बस. त्या दिवसापासून त्यांनी अस्लमला गावाच्या नदीत पोहणे शिकवायला सुरुवात केली. काही दिवसांनंतर अस्लमने पोहण्याचे कौशल्य मिळवले. त्याला शाळेच्या वतीने स्पर्धेत सामील करण्याकरिता निवडले गेले. स्पर्धेचे नियम समजावले गेले.



नियोजित वेळी स्पर्धेच्या ठिकाणी त्याला हजर राहण्यास सांगण्यात आले.

शेवटी स्पर्धेचा दिवस उजाडला. अस्लमच्या वडिलांची प्रकृती बरी नव्हती; म्हणून ते अस्लमबरोबर जाऊ शकले नाहीत. त्यांनी व आईने अस्लमला आशीर्वाद दिला. घरातून बाहेर पडताना अस्लमची छोटी बहीण आलियाही त्याच्याबरोबर निघाली.

रस्त्यात ते नदीजवळून जात असताना त्यांना 'वाचवाऽऽ' अशी हाक ऐकू आली. ते दचकून उभे राहिले. तेवढ्यात पुन्हा तशीच हाक ऐकू आली. ''वाचवाऽ, वाचवाऽऽ, अरे, कुणीतरी माझ्या बाळाला वाचवा !'' आवाज नदीकडून येत होता. अस्लम आणि आलिया दोघे नदीकडे धावत सुटले, पाहिलं, तर एक बाई नदीकाठी ओरडत उभी होती - ''अरे, कोणीतरी माझ्या मनोहरला वाचवा, तो खेळताना पाण्यात पडला आहे.''

अस्लमने नदीत बघितले, दूरवर एक छोटासा मुलगा पाण्याच्या लाटांबरोबर गटांगळ्या खात वाहत होता.

विचार करायची ती वेळ नव्हती. त्याने झटकन पाण्यात उडी मारली आणि वेगाने पोहत त्या मुलाकडे जाऊ लागला. पोहण्याचा सराव त्याला उपयोगी पडला. लवकरच तो त्या बुडत्या मुलापाशी पोहोचला आणि त्याला पकडले. मुलगा खूपच भ्यालेला होता. त्याने अस्लमला घट्ट मिठी मारली. आता अस्लमला पोहता येईनासे झाले; पण त्याने महत्प्रयासाने कसेबसे मुलाला काठावर आणले. बाईने झटकन मुलाला आपल्या मिठीत घेतले. बुडत असताना खूप पाणी त्याच्या पोटात गेले होते. अस्लमच्या म्हणण्याप्रमाणे बाईने मुलाला जमिनीवर पालथे केले व त्याच्या पाठीवर हातांनी भार दिला. पोट दाबल्याने पोटातले पाणी तोंडावाटे

बाहेर पडले. मुलाला कापरे भरले. अस्लमने त्याचे तळवे हळूहळू चोळले. बाईने सुक्या फडक्याने त्याचे अंग पुसले. मुलाने डोळे उघडले, तेव्हा बाईच्या जिवात जीव आला. तिने अस्लमला छातीशी धरले व खूप खूप आशीर्वाद दिले. आलियाचेही लाड केले. मग अचानक तिला काहीसे आठवले. तिने आपल्या साडीच्या पदराला मारलेली गाठ मोठ्या चपळाईने सोडली. त्यात काही शिक्के होते. त्यांतून पाच रुपयाचा एक शिक्का निवडून तिने अस्लमला दिला; पण अस्लमने तो घेण्यास नकार दिला, तेव्हा ती बाई रडकुंडीला येऊन म्हणाली, ''बेटा ! मी गरीब. तुला काय देणार ? आपल्या बाळाचा जीव वाचला या आनंदात मी तुला खाऊसाठी देत आहे. घेशील तर मला आनंद होईल.''

तिच्या समाधानाकरिता अस्लमने तो शिक्का घेतला. मग तो आपल्या बहिणीला घेऊन धावत-पळत स्पर्धेच्या ठिकाणी पोहोचला. स्पर्धेचा प्रारंभ झाला होता. कोणीतरी त्याला सांगितले, की तीन वेळा तुझे नाव पुकारण्यात आले. तू अनुपस्थित असल्यामुळे तुझे नाव स्पर्धेतून वगळण्यात आले. अस्लमला पाहिल्यावर त्याची काहीही विचारपूस न करता मुख्याध्यापक त्याच्यावर खूप रागावले. अस्लमच्या डोळ्यांतून अश्रू ढळू लागले. त्याला वाटले आता घरी गेल्यावर वडीलसुद्धा रागावतील.

शेवटी खिन्न मनाने व जड पावलांनी तो आपल्या बहिणीसोबत घरी परतला. वडिलांनी विचारले, ''असा रडका चेहरा का केला आहेस ?''

अस्लम काय सांगणार, तो मान खाली घालून उभा राहिला. त्याच्या डोळ्यांतून अश्रू टपटप गळत होते, तेव्हा आलिया पुढे झाली व तिने सर्व हकीगत वडिलांना सांगितली. ''असं काय ! कुठं



आहे तो शिक्का ?'' त्यांनी विचारले. भेदरलेल्या अवस्थेत अस्लमने खिशातून तो शिक्का काढून वडिलांना दिला.

काही क्षण ते अद्‌भुत दृष्टीने तो शिक्का पाहत राहिले, जणू पाच रुपयाचा शिक्का ते पहिल्यांदाच पाहत होते. मग त्यांच्या चेहऱ्यावर आनंदमिश्रित स्मित तरळले. त्यांनी तो शिक्का कपाटाच्या वरच्या खणात ठेवला नि वळून अस्लमच्या माथ्याचे चुंबन घेतले.

लेखक व अनुवादक - श्री. मुश्ताक बोलिंजकर



उर्दू
बालभारती : इयत्ता ४ थी
चौथी माला : १९९८

# १८. निवाडा

एक गाव होते. त्याचे नाव रामापुरम. त्या गावात चार भावंडे राहत होती. त्यांचा कापसाचा व्यापार होता. चारी भावंडांनी मिळून एक मांजर पाळले होते. प्रत्येकाने मांजराचा एकेक पाय वाटून घेतला. जो तो आपापल्या वाट्याला आलेल्या मांजराच्या पायाला नटवत, सजवत असे. काही काळ असाच गेला. एके दिवशी ते चारीजण एक विचित्र समस्या घेऊन मर्यादा रामन्नाकडे आले.

त्यातले थोरले तिघे याचना करत रामन्नाला म्हणाले, ''महाशय, आम्ही साऱ्यांनी मिळून एक मांजर पाळले आहे. त्याचे पाय आम्ही समानतेने वाटून घेतले. आमच्या धाकट्या भावाच्या वाट्याला आलेल्या पायाला दुखापत झाली. मांजर लंगडू लागलं, त्यामुळे धाकट्या भावानं त्या पायाला औषध लावून, तेलात बुडवलेल्या फडक्यानं त्याची जखम बांधली. उंदराचा पाठलाग करताना ते मांजर दिव्याच्या जवळून गेलं, त्यामुळं तेलानं माखलेल्या त्या फडक्यानं पेट घेतला, तेव्हा ते भयभीत झालेलं मांजर कापसाच्या गोदामात शिरलं. सारा कापूस आगीत भस्मसात झाला. धाकट्या भावाच्या वाट्याला आलेल्या पायामुळंच आमचं नुकसान झालं. त्यामुळे आपण आम्हांला त्याच्याकडून नुकसान भरपाई मिळवून द्यावी.''

यानंतर धाकटा भाऊ पुढे येत म्हणाला, ''महाशय, जळून गेलेल्या कापसात माझाही वाटा आहे, तेव्हा माझ्या नुकसानीची जबाबदारी कोण घेईल ? मांजर गोदामात शिरलं त्याला मी काय करू शकतो ? नुकसान भरपाई देण्याइतके माझ्याकडे धन नाही.''

सभेस उपस्थित असलेल्या लोकांना आधीच्या तिघा भावंडांचे



म्हणणे पटले होते. 'धाकट्या भावाने नुकसान भरपाई द्यावी', असे त्यांचे मत पडले.

सभेच्या या मताला बाजूला सारत मर्यादा रामन्ना म्हणाला, ''बाबांनो, कापूस भस्मसात झाला, ही गोष्ट खरी आहे; परंतु तुमच्या धाकट्या भावाच्या वाट्याला आलेल्या पायामुळे नव्हे, त्याच्या वाट्याचा पाय तर जखमी स्थितीत होता. त्या लंगड्या पायानं ते मांजर गोदामाजवळ जाऊच शकत नाही. तुमच्या वाट्याच्या तीन पायांच्या साहाय्यानेच ते मांजर गोदामात शिरलं. सबब तुम्ही तिघांनीच तुमच्या धाकट्या भावास नुकसान भरपाई द्यावी.'' आता दुसरा पर्याय नसल्याने थोरल्या तीन भावांनी धाकट्या भावास नुकसान भरपाई दिली.

हा निवाडा ऐकून साऱ्या सभाजनांनी मर्यादा रामन्नाचा निवाडा योग्य असल्याचा निर्वाळा देत त्याची वाहवा केली. धाकट्या भावाने रामन्नाजवळ कृतज्ञता व्यक्त केली.

मराठी अनुवाद - लक्ष्मीनारायण बोल्ली

❑❑❑

तेलुगु
बालभारती : इयत्ता ३ री
चौथी माला : १९९८

# १९. श्रेष्ठ कोण ?

चांगल्या तब्येतीचा ढेरपोट्या पोटप्पा एकदा त्याच्या जवळच्या नातेवाईकाच्या लग्नाला गेला. लग्नामध्ये लाडवाचे जेवण होते. पोटप्पाने जेवणावर चांगलाच ताव मारला, त्यामुळे त्याला सुस्ती आली. एक चांगली जागा पाहून तो तिथेच झोपी गेला.

पोटप्पा गाढ झोपी गेल्यावर त्याच्या शरीरातील सर्व अवयवांनी एक सभा घेतली. प्रत्येकजण एक-दुसऱ्याला आपापली अडचण सांगू लागला. प्रत्येक अवयवाला आपणच श्रेष्ठ आहोत असे वाटे. यातून कलह वाढला. सर्व अवयव आपापसात भांडू लागले. जो तो पोटाला दोष देऊ लागला. शेवटी सर्व अवयवांनी मिळून पोटावर ठपका ठेवला.

पाय म्हणू लागले, ''आम्ही या मोठ्या शरीराचा आधार पेलतो. शाळेला, बाजाराला कुठेही जायला आमच्यांशिवाय पर्याय नसतो. शरीराला इकडून तिकडे नेतेवेळी कित्येकदा आम्ही जखमी होतो. हा पोटाचा नगारा उचलून आम्ही मेजवानीत न्यायचे आणि मेजवानीतले चांगले चांगले पदार्थ याने फस्त करायचे नि आराम करायचा. पोटाला दुसरे काही कामच नाही. किती दिवस आम्ही हा नगारा घेऊन फिरणार ? आम्ही दमलो बुवा ! यापुढे हे काम अजिबात करणार नाही.''

हात म्हणाले, ''सकाळी उठल्यापासून झोपेपर्यंत आम्ही काही ना काही काम करत असतो. दात घासणे, केस विंचरणे, अंगावर कपडे चढवणे, खाणे-पिणे, लिहिणे अशी एक ना अनेक कामे आम्हीच करतो. किती श्रमतो आम्ही ? किती कष्ट पडतात आम्हांला, ते या पोटोबाला काय माहीत ? आम्ही उचलून दिलेल्या



अन्नाचा घास हडप करून हा पोटोबा आनंदाने वाढतोय. हा अन्याय आम्ही किती दिवस सहन करायचा ? यापुढे आम्ही हे काम करणार नाही.''

नंतर डोळे बोलू लागले, ''पायाला आम्हीच वाट दाखवतो....'' असे बोलणे सुरू करताच मध्येच नाक म्हणाले, ''हवेतील चांगला वाईट.....''; परंतु अध्यक्ष कानांनी नाकाला मध्येच थांबवून सूचना केली, की ''एकजण बोलत असताना दुसऱ्याने मध्येच बोलायला सुरुवात करणे, हे सभेच्या नियमात बसत नाही. आधी डोळ्यांना जे बोलायचे ते बोलू द्या.'' यानंतर डोळ्यांनी आपले बोलणे पुढे सुरू केले, ''बऱ्याचजणांना बोलायचे आहे; म्हणून थोडक्यात कथन करतो. पाय असो, हात असो त्यांना आम्हीच मार्गदर्शन करतो. घर, रस्ता, शाळा, कार्यालय कुठेही जा, आमच्या मार्गदर्शनाशिवाय कुठलेच काम होत नाही; म्हणून संस्कृत भाषेत म्हटले आहे, 'सर्वांगाना नयनम् प्रधानम्' म्हणजे सर्व अवयवांत डोळे महत्त्वाचे आहेत. असं असूनही आम्हांला प्रत्यक्षात फायदे काहीच नाहीत. जेवण शोधून दाखवण्याचे काम आम्ही करतो आणि ते जेवण फस्त करण्याचं काम पोट करतं. हा अन्याय आता आम्ही सहन करणार नाही. यापुढे आम्ही काम करणार नाही; मगच कळेल आमचे महत्त्व या आळशी पोटाला !'' असे डोळ्यांनी जोरदार आवाजात भाषण दिले. नंतर कान नाकाला म्हणाले, ''आता बोला तुम्हांला काय बोलायचे ते.'' त्यावर नाक बोलू लागले, ''हवेतील चांगला वाईट गंध आमच्यामुळेच कळतो. माणसाला जिवंत राहण्यासाठी रात्रंदिवस सातत्याने होणारी श्वसनप्रक्रिया आमच्यामार्फतच चालू राहते. पोटामध्ये जाणारे अन्न चांगले आहे, की नाही हे आम्ही ठरवतो, पोट मात्र चांगला आहार घेऊन नुसता आराम करतं. हे

असेच चालू राहणार असेल, तर यापुढे आम्ही आमचे काम बंद करू.''

नाकाचे बोलणे संपल्यावर तोंडानेही जाहीर केले, की ''या मोठ्या पोटाला पोसण्यासाठी अन्न चावून चावून दाढा दुखत आहेत. चर्वण करून करून खूप दमलो बुवा आम्ही ! आता यापुढे काम करणार नाही.'' यानंतर सर्वांनी मिळून संप करण्याचा निर्णय घेतला.

सर्व अवयवांच्या गोष्टी ऐकून पोटाला हसू आले. एखाद्या महान तात्विकासारखा तो फक्त हसला.

सर्व अवयवांनी संपाचा निर्णय घेऊन दोन-तीन दिवस उलटले. पोटाला अन्न मिळेना; परंतु पोटापेक्षा इतर अवयवांनाच याचा त्रास जाणवू लागला.

पायाला आश्चर्य वाटू लागले, की ''हे काय ? काम करत असताना चांगले वाटत होते. आता एवढा अशक्तपणा का वाटतो ?''

हात म्हणाले, ''आमचीसुद्धा तीच अवस्था आहे.''

डोळे म्हणाले, ''आई गऽऽ हा काय ! डोळ्यांसमोर सगळीकडे अंधार दिसतो. डोळ्यांवर झापड येऊन डोळे सारखे बंद का होत आहेत ?''

नाक म्हणाले, ''हे काय ? आमच्या संवेदना कुठे गेल्या ? चांगले-वाईट काही कळतच नाही. वास घ्यायला इच्छा नाही ?''

तोंड म्हणाले, ''हे काय जीभ कोरडी पडली आणि घसाही कोरडा पडत आहे. गालपाड आत बसले आहेत. मोठ्याने बोलताही येत नाही.''

सभाध्यक्ष कानसुद्धा म्हणाले, ''अरे, हे काय ? खूपच कमी



ऐकायला येतंय ?''

सर्व अवयवांचे हे बोलणे ऐकल्यानंतर शांतपणाने सर्वांना उद्देशून पोट म्हणाले, ''मित्रांनो, तुम्ही सगळ्यांनी माझ्यावर रागावून मत्सराने आपापले काम सोडले. तुम्हांला वाटते, की मी काहीही काम करत नाही; परंतु ते चुकीचे आहे. तुम्ही सगळे मिळून दिलेल्या अन्नाचे मी पचन करतो. त्याच्यातील नको असलेले घटक काढून टाकून बाकी रक्तात मिसळतो. रक्तामार्फत तुम्हांला शक्ती देतो. ही सगळी कामे शांतपणे बाहेर न दिसू देता आतल्याआत करून घेतो. सगळ्यांना आपापल्या कामाचे महत्त्व आहेच. या सृष्टीतले काहीही निरर्थक नाही. सगळ्यांनी आपापले काम चांगले मन लावून मेहनतीने केले, की सगळे सुखी आणि आनंदाने राहू शकतात.''

पोटाचे हे बोलणे ऐकून सर्व अवयव मिळून पोटाला म्हणाले, ''तुम्ही जे बोललात ते सगळे खरे आहे. आम्हांला चांगला धडा मिळाला. यापुढे कधीही आम्ही असे करणार नाही.''

मराठी अनुवाद - डॉ. तुलसी भारत

❑❑❑

तेलुगु
बालभारती : इयत्ता ३ री
चौथी माला : १९९८

# २०. जगदीशचंद्र बोस

मार लागला, की आपण वेदनेने विव्हळतो, रडतोसुद्धा. प्राणी, पक्षीसुद्धा वेदनेने कळवळतात. हेही आपल्याला ठावूक आहे, मग झाडांना, रोपट्यांना मार लागल्यास ते विव्हळतात का ? होय. त्यांना वेदना होतात, कारण त्यांनासुद्धा प्राण आहे. एवढंच नव्हे, तर ते माणसांप्रमाणे झोप घेतात, आनंदी होतात. त्यांना स्पर्शाची जाणीव होते, असा सर्वप्रथम शोध शास्त्रज्ञ सर जगदीशचंद्र बोस यांनी लावला. ते भारतीय असल्याने त्यांचा आपणांस अभिमान वाटतो.

इ. स. १८५८ साली बंगालमध्ये सर जगदीशचंद्र बोस यांचा जन्म झाला. त्यांचे वडील भगवानचंद्र बोस हे प्रख्यात न्यायाधीश होते. इतरांच्या कल्याणासाठी झटणारे म्हणून त्यांची ख्याती होती. अनेकदा चोरांनासुद्धा सन्मार्गावर आणण्यासाठी त्यांनी प्रयत्न केले होते.

जगदीशचंद्र बोस हे लहानपणापासूनच आपल्या अवतीभवती दिसणाऱ्या प्रत्येक बाबीबद्दल कुतुहलाने वडिलांना प्रश्न विचारत. वडीलसुद्धा न चिडता त्यांच्या प्रश्नांची उत्तरे देऊन, त्यांच्यातील जिज्ञासू वृत्ती वाढवत असत. शेतकऱ्यांची मुलं, त्यांचे शाळकरी मित्र होते. त्यांच्याकडून झाडांबद्दल त्यांना विविध माहिती ऐकायला मिळत असे, त्यामुळे त्यांना झाडांविषयी विशेष आकर्षण वाटू लागे.

महाविद्यालयात शिकताना ते एका वसतिगृहात राहत असत. त्या वसतिगृहाच्या बाजूला एक छोटीशी बाग निर्माण करून ते त्यातील झाडांवर विविध वैज्ञानिक प्रयोग करत राहायचे. तेथील



त्यांचा भौतिकशास्त्राचा अभ्यास पाहून थक्क झालेल्या प्राचार्यांनी त्यांना उच्च शिक्षणासाठी इंग्लंडला पाठवण्याचे ठरवले. त्यांची आर्थिक परिस्थिती बेताची होती. परदेशी पाठवणे आर्थिकदृष्ट्या परवडणारे नव्हते. वडिलांनी त्यांना परदेशी पाठवण्यास नकार दिला; परंतु आईने आपल्या अंगावरचे दागिने विकून त्यांना परदेशी पाठवले.

परदेशात त्यांनी तीन वर्षे वृक्षशास्त्राचा अभ्यास केला. वृक्षांवर अनेक प्रयोग केले. मनुष्यप्राणी आणि वृक्षजीव यात खूपसे साम्य असल्याचे त्यांच्या लक्षात आले. प्राणीमात्राप्रमाणेच झाडांनासुद्धा जीव आहे. ते श्वासोच्छ्वास करतात, रात्रीच्या वेळी झोप घेतात, विषबाधेने मरतात, अशी माहिती त्यांनी जगास दिली.

जगदीशचंद्र बोस यांच्या या अभ्यासावर परदेशी शास्त्रज्ञांचा विश्वास बसला नाही. त्यांनी त्यांची कुचेष्टा केली. तरीसुद्धा ते निराश झाले नाहीत. त्यांनी लावलेल्या शोधाची प्रचिती देण्यासाठी आवश्यक अशा उपकरणांची निर्मिती त्यांनी स्वत:च केली. इंग्लंडमध्ये भरलेल्या शास्त्रज्ञांच्या महासभेत त्यांनी आपला शोध, उपकरणांच्या साहाय्याने सिद्ध करून दाखवला. जगातले सारे शास्त्रज्ञ आश्चर्याने थक्क झाले. त्यांनी लावलेला हा शोध सत्य असल्याचा निर्वाळा देत, साऱ्या शास्त्रज्ञांनी त्यांची वाहवा केली.

एकदा फरीदपूर येथे उत्सव पाहण्यासाठी ते गेले होते. तेथील लोक ताडाच्या झाडाची पूजा करताना त्यांनी पाहिले. ते झाड सुमारे तीन-चार मीटर उंचीचे होते. ते झाड जमिनीकडे झुकलेले असायचे. सकाळी ते झाड काहीसे ताठ, तर संध्याकाळी जमिनीकडे झुकलेले दिसायचे. इतर वृक्षांत न दिसणारा हा गुण या झाडात आहे, असे समजून लोक त्या झाडाला देवाचे झाड म्हणून पूजा करू लागले,

नवस बोलू लागले, तेव्हा जगदीशचंद्र बोस यांनी आपली उपकरणे त्या झाडाला लटकावून, त्याचे काही दिवस निरीक्षण केले आणि या झाडातील हा विशेष गुण इतर झाडांमध्येदेखील आहे, हे त्यांनी लोकांना पटवून दिले आणि त्यांच्या मनातील अंधश्रद्धा काढून टाकली.

सर जगदीशचंद्र बोस हे जसे महान शास्त्रज्ञ होते, तसे ते थोर देशभक्तही होते. त्या काळात आपल्या देशात प्रयोगशाळांची संख्या फार कमी होती, तेव्हा त्यांनी कलकत्ता (कोलकाता) येथे प्रयोगशाळेची निर्मिती केली. आपली सारी संपत्ती त्यांनी त्या प्रयोगशाळेस देऊन टाकली. पुढे ती प्रयोगशाळा 'बोस संशोधन केंद्र' म्हणून प्रसिद्धीस आली. आयुष्यभर ते संशोधनाचे कार्य करत राहिले. इ. स. १९३७ साली वयाच्या ७९ व्या वर्षी त्यांचे निधन झाले.

मराठी अनुवाद - लक्ष्मीनारायण बोल्ली

❑❑❑

तेलुगु
बालभारती : इयत्ता ३ री
चौथी माला : १९९८



## २१. अजून धडा पक्का झाला नाही

शाळेचा पहिला दिवस होता. आचार्य नवीन होते. शिष्यही नवीन होते.

आचार्यांनी सांगितले, ''लिहा – सत्यं वदामि। आता वाचा.'' सर्वांनी वाचले, ''सत्यं वदामि. मी सत्य बोलतो''.

आचार्य म्हणाले, ''उद्या हा धडा पक्का करून या.''

आचार्य होते द्रोण. शिष्य होते कौरव-पांडव. दुसऱ्या दिवशी आचार्यांनी विचारले, ''कालचा धडा पक्का झाला ?''

''होऽऽऽ'' सगळ्यांनी एका सुरात सांगितले.

मग आचार्यांनी लिहिले, ''सत्यं वदामि....मी सत्य बोलतो.'' सगळे शिष्य एकापाठोपाठ एक वाचायला लागले. ''सत्यं वदामि. मी सत्य बोलतो.'' अर्जुनाने वाचले. दुःशासनाने वाचले. वर्गात लक्ष न देणाऱ्या भीमानेदेखील न अडखळता वाचले. आता युधिष्ठिराची पाळी आली. युधिष्ठिराने हात जोडून आचार्यांना प्रणाम केला व म्हणाला, ''गुरुदेव, माझा नाही झाला अजून धडा पक्का.''

द्रोण म्हणाले, ''बरं, उद्या तयार करून ये.''

दुसऱ्या दिवशी त्यांनी विचारले, ''काय रे, झाली का तयारी ?''

युधिष्ठिर पुन्हा म्हणाला, ''अजून नाही झाला धडा.''

आचार्यांनी आणखी एका दिवसाची मुदत दिली, तरीही युधिष्ठिराला काही जमेना. असे चार-पाच दिवस गेल्यानंतर द्रोणाचार्य आश्चर्याने युधिष्ठिराला म्हणाले, ''यात अजून न होण्यासारखं काय आहे ? या मठ्ठ दुःशासनानेदेखील घडाघडा वाचले; 'सत्यं वदामि' आणि तुला कसं जमत नाही अजून ? उद्या

शेवटची मुदत देतो तुला.''

वर्गात सर्वांना वाटले, की युधिष्ठिराला जर एवढेसुद्धा येत नसेल, तर गुरुदेव रागावले हे योग्यच आहे.

दुसऱ्या दिवशी पुन्हा द्रोणाचार्यांनी विचारले. पुन्हा युधिष्ठिराचे तेच उत्तर. ''अजून धडा पक्का झाला नाही''

आता मात्र आचार्य थोडे चिडलेच. ''अगदी बैलोबा आहेस तू. यात न येण्यासारखं आहे काय ?''

सगळा वर्ग हसू लागला. युधिष्ठिर अडखळत म्हणाला, ''गुरुदेव, आपण धडा पक्का करायला सांगितलात आणि मी खूप प्रयत्न करतो आहे; पण अजून कधीकधी माझ्याकडून खोटं बोललं जातं. जोपर्यंत मी सत्याच्या कसोटीला पूर्णपणे उतरत नाही, तोपर्यंत मी कसं म्हणू, की मी सत्य बोलतो.''

यावर सगळा वर्ग शांत झाला.

लेखक - मनुभाई पंचोली 'दर्शक'
मराठी अनुवाद - पद्माबेन मेहता



गुजराती
बालभारती : इयत्ता २ री
चौथी माला : १९९७



## २२. रुखीची कमाल

रुखी नावाची एक मुलगी होती. ती तिच्या आईबाबांबरोबर शेतात राहत असे. शेतात एका बाजूला त्यांचे लहानसे घर होते. दुसरीकडे गुरांचा गोठा होता. जवळच गवताची गंजी रचून ठेवली होती. तिथेच एका झाडाखाली मोती कुत्रा राखण करत पडून असायचा.

रुखीचे आईवडील शेताची आणि घरची कामे करत असत. रुखी गुरांना चारापाणी देई. शेण काढी. वासरांवर तर तिचा खूप जीव होता. ती तिची भावंडंच होती जणू ! त्यांना ती येताजाता मायेनं गोंजारी.

एकदा काय झालं, रुखीचे आईबाबा शेजारच्या गावात बाजाराला गेले. घरात रुखी एकटीच होती. अंगणात एका मोठ्या झाडाच्या फांदीला झोपाळा बांधला होता. रुखी मजेत गाणी म्हणत, झोके घेत होती. इतक्यात तिला गोठ्यातून गाईंच्या हंबरण्याचा आवाज ऐकू आला. म्हशीही रेकत होत्या, मोती जोरजोराने भुंकत होता. रुखीने गोठ्याकडे बघितले. गवताच्या गंजीतून भकाभका धूर निघत होता. गंजीने पेट घेतला होता.

तसे पाहिले, तर आपली रुखी फक्त बारा वर्षांचीच होती; पण किती हुशार आणि धीराची होती ती ! गंजी पेटल्याचे लक्षात येताच पटकन घरात जाऊन तिने मोठा सुरा आणला आणि गोठ्यात धावत गेली. गोठ्यात सगळीकडे धूर झाला होता. वासरे दावणीला हिसके देत होती. सर्वांत आधी रुखीने लहान वासरांच्या दावणीचे दोर कापून टाकले. भराभर वासरे गोठ्याच्या बाहेर पळत सुटली. त्यांचा जीव वाचला.

अजून कितीतरी गाई, म्हशी, बैल आत अडकून पडले होते. अंधाऱ्या गोठ्यात गुरांची शिंगे रुखीला सारखी लागत होती; पण दोर कापायचे काम तिने काही थांबवले नाही. सपासप एकामागून एक कितीतरी गुरांची तिने सुटका केली. थोड्याच वेळात आसपासचे लोकही जमा झाले. कोणी गंजीवर पाणी मारू लागले, तर कोणी गोठ्यात रुखीच्या मदतीला गेले.

तेवढ्यात रुखीचे आईबाबाही आले. घराजवळ गर्दी व धूर बघून त्यांना धस्स झाले. बाबा जोरात ओरडलेच, ''बाळा रुखी, तू लवकर बाहेर पड. आग पसरते आहे. मी आलोच आत.''

रुखीने ओरडून सांगितले, ''आता दोन तीन गुरांनाच सोडवायचं राहिलं आहे. ही मी आलेच. तुम्ही मुळीच काळजी करू नका.''

सगळ्या गुरांची सुटका करून, शेवटी रुखी गोठ्याच्या बाहेर पडली. तिला थोडेसे भाजले होते. बाहेर येताक्षणीच तिने आईबाबांना मिठी मारली. गावचे पाटील आले. ते रुखीच्या बाबांना म्हणाले, ''तुमची पोर मोठी हिमतीची आहे. किती गुरांचे प्राण वाचवलं तिनं आज. शाबास पोरी, धन्य आहे तुझी !''

हे ऐकून रुखी म्हणते कशी, ''त्यात शाबासकी कसली ? ही सगळी माझी मुकी भावंडंच नाहीत का ? त्यांच्याशिवाय मी कशी राहीन ?''

सारा गाव एका सुरात बोलत होता, ''रुखी तू तर आज कमाल केलीस !''

मराठी अनुवाद - पद्माबेन मेहता

❑❑❑

गुजराती
बालभारती : इयत्ता २ री
दुसरी माला : १९७९



# २३. विद्या उजळली

नदीच्या तटावर अत्री ऋषिंचा आश्रम होता. त्या आश्रमात अनेक शिष्य विद्या शिकायला येत असत. त्यांचे शिक्षण संपले, की ते गुरुंचे आशीर्वाद घेऊन घरी जायचे.

एकदा ऋषिंच्या तीन शिष्यांचे शिक्षण पूर्ण झाले. त्या तीनही शिष्यांनी स्वत:च्या घरी जाण्याची तयारी केली. घरी जाण्यापूर्वी ते गुरुंचे आशीर्वाद घ्यायला गेले.

गुरुंच्या पाया पडून ते म्हणाले, ''गुरुदेव, आम्हांला आशीर्वाद द्या. आम्हांला घरी जाण्याची परवानगी द्या.''

गुरुंनी त्यांना आशीर्वाद दिला व म्हणाले, ''तुम्ही उद्या घरी जा.''

आपण दिलेली विद्या शिष्य नीट शिकले आहेत, की नाहीत हे जाणून घेण्यासाठी गुरुंनी त्यांची परीक्षा घेण्याचे ठरवले.

दुसऱ्या दिवशी गुरुजी सकाळी लवकर उठले व थोडे काटे जमवून आश्रमाच्या फाटकाजवळील रस्त्यावर पसरून ठेवले, नंतर ते जवळपास लपून बसले.

दुसऱ्या दिवशी तीन्ही शिष्य आश्रमातून आपापल्या घरी जायला निघाले. पहिला शिष्य फाटकाजवळ गेला. त्याने रस्त्यावर काटे पसरलेले पाहिले. तो उडी मारून काटे ओलांडून पुढे गेला. नंतर दुसरा शिष्य फाटकाजवळ गेला. त्याने रस्त्यावर काटे पसरलेले पाहिले. त्याने जवळचा एक मोठा दगड उचलून काट्यांवर ठेवला. मग तो त्या दगडावर पाय ठेऊन पुढे गेला.

तिसरा शिष्य फाटकाजवळ गेला. त्याने रस्त्यावर दगड व काही काटे पाहिले. स्वत:चे सामान बाजूला ठेवून त्याने दगड उचलला.

पसरलेले काटे गोळा केले आणि कोणालाही लागू नयेत इतक्या लांब नेऊन दगड व काटे टाकून दिले.

गुरुजी या तीन्ही शिष्यांचे वागणे पाहत होते. त्यांनी बाहेर येऊन पहिल्या दोन शिष्यांना परत येण्यास सांगितले व म्हणाले, ''तुमचे शिक्षण अजूनही अपुरे आहे, तेव्हा तुम्ही घरी न जाता आश्रमातच थांबा.''

तिसऱ्या शिष्याला मिठी मारत गुरुजी म्हणाले, ''तू एकट्यानेच मी दिलेली विद्या उजळ केली आहेस. माझा उपदेश फक्त तूच आचरणात आणला आहेस. प्रत्येक माणसाने फक्त स्वत:च्या हिताकडे न पाहता दुसऱ्याचेसुद्धा हित पाहिले पाहिजे. तू जा, तुला माझे आशीर्वाद आहेत. आयुष्यात तू नक्कीच यशस्वी होशील''.

लेखक - यशवंत मेहता
मराठी अनुवाद - उषाबेन शेठ



गुजराती
बालभारती : इयत्ता २ री
दुसरी माला : १९७९



## २४. विक्रम साराभाई

सहा-सात वर्षांचा एक मुलगा उन्हाळ्यात आईवडलांबरोबर सिमल्याला राहायला गेला. घरात आईबाबांना तसेच इतर मोठ्या माणसांना पुष्कळ पत्रे येत असत. ते बघून त्याला वाटे, ''मला का बरं एकही पत्र येत नाही ? काहीतरी करायला पाहिजे.'' तो गेला सरळ वडलांच्या चिटणीसाकडे. पाच-सहा पाकिटे घेतली. मग त्या पाकिटांवर त्याने स्वत:चे नाव व पत्ताही टाईप करून घेतला, नंतर झटपट स्वत:च्या खोलीत जाऊन स्वत:लाच एक पत्र लिहून टाकले. घडी करून पाकिटात घातले आणि बंगल्याच्या बाहेर असलेल्या पोस्टाच्या पत्रपेटीत टाकून आला. मनातल्या मनात त्याला गुदगुल्या होत होत्या. 'आता येईल खरी मजा ! या सगळ्या मोठ्या माणसांसारखं मलाही पत्र येईल !'

दुसऱ्या दिवशी इतर सगळ्यांच्या पत्रांबरोबर तेही पाकीट आले. वडलांनी त्याला हाक मारून देऊन टाकले. चला, प्रयोग यशस्वी झाला. इतर कोणी नको लिहू देत. बिघडतं कुठे ? आपण स्वत: तर स्वत:ला पत्र लिहू शकतो ना ! दुसऱ्या दिवशीही त्याने स्वत:ला एक पत्र लिहिले. वडलांनी तेही त्याच्या हवाली केले. असे तीन-चार दिवस चालले. तोपर्यंत ही बाब कोणाच्याच लक्षात आली नाही. पाचव्या दिवशी मात्र वडलांनी विचारले, ''तुला कुणाचं रे पत्र येतं रोज ?'' मुलगा लगेच म्हणाला, ''कुणाचं म्हणजे काय ? माझं मीच लिहितो मला. तुम्हांला सर्वांना कोणाची ना कोणाची पत्रं येतात. मग मला नाही का वाटणार मलाही पत्र यावं असं ?''

लाडक्या मुलाचे उत्तर ऐकून वडील खो-खो हसायला लागले. मुलाचे पाय पाळण्यात दिसतात, ही म्हण सार्थ करणारी ही घटना

होती. आवडती वस्तू मिळवण्यासाठी लहानपणापासूनच युक्त्या लढवणारा हा मुलगा म्हणजेच डॉ. विक्रम अंबालाल साराभाई. त्यांचा जन्म १२ ऑगस्ट, १९१९ रोजी अहमदाबादमध्ये झाला. पाडव्याच्या शुभमुहूर्तावर जन्मलेले विक्रमभाई मोठेपणी एक थोर शास्त्रज्ञ म्हणून नावारूपाला आले.

भाषा, गणित, शास्त्र आणि कलांचा अभ्यास विक्रमभाईंनी घरीच केला. मॅट्रिकच्या परीक्षेत उत्तम गुण मिळवून ते केंब्रिजला गेले. तिथे शास्त्र विषयातील पदवी मिळूवन ते भारतात परत आले.

त्यानंतर बंगलोरमध्ये राहून त्यांनी सर सी. वी. रमण यांच्याबरोबर विज्ञानाचे नवनवे प्रयोग करायला सुरवात केली. त्यांचा गाजलेला 'कॉस्मिक किरणे' हा शोधदेखील त्यांनी तिथेच लावला. यानंतर त्यांची थोर शास्त्रज्ञांमध्ये गणना होऊ लागली.

देशपरदेशातल्या अनेक नियतकालिकांमध्ये विक्रमभाईंचे लेख छापून आले. वेगवेगळ्या ठिकाणी भरणाऱ्या विज्ञानपरिषदांची आमंत्रणेही मिळू लागली. विज्ञानक्षेत्रातल्या त्यांच्या कामगिरीबद्दल त्यांना 'डॉ. शांतिस्वरूप भटनागर मेमोरियल पुरस्कार' मिळाला. १५ ऑगस्ट १९६५ रोजी राष्ट्रपतींच्या हस्ते विक्रमभाईंना 'पद्मभूषण' हा किताब देण्यात आला. त्यानंतर त्यांना 'अणुशक्ती समिती'चे अध्यक्षस्थानही बहाल करण्यात आले. अशा प्रकारे त्यांची कीर्ती वाऱ्याच्या वेगाने देशविदेशात पसरली.

१९७१ च्या डिसेंबर महिन्यात 'थुम्बा' येथील एका परिषदेस हजर राहण्यासाठी विक्रमभाई त्रिवेंद्रमला गेले होते. तिथून बारा कि.मी. अंतरावर असलेल्या एका सरकारी विश्रामगृहात ते उतरले होते. तिथे ३० डिसेंबरला गुरुवारी निद्रावस्थेत असतानाच त्यांचा जीवनदीप



मालवला; परंतु भारतमातेचा हा लाडका सुपुत्र त्याच्या कामगिरीने अमर झाला.

लेखिका - किशोरी तिजोरीवाला
मराठी अनुवाद - पद्माबेन मेहता



गुजराती
बालभारती : इयत्ता ४ थी
दुसरी माला : १९८३

# २५. कष्टाचे फळ

एका गावात दीनदयाळ नावाचा शेतकरी राहत होता. त्याला दोन मुले होती. ती फारच आळशी होती. दीनदयाळ आता म्हातारपणामुळे थकला होता. एके दिवशी त्याने आपल्या दोन्ही मुलांना जवळ बोलावले व त्यांना सांगितले, ''मुलांनो, मी आता जास्त दिवस जगणार नाही, मला तुम्हांला एक महत्त्वाची गोष्ट सांगायची आहे. आपल्या शेतात मी खूप धन पुरून ठेवले आहे. माझ्या मृत्यूनंतर तुम्ही दोघं मिळून शेत खोदा आणि ते दोघं वाटून घ्या.''

दोन्ही मुलं आनंदी झाली. पुढे काही दिवसांनी दीनदयाळ मरण पावला. वडिलांच्या मृत्यूनंतर दोन्ही मुलांना शेतातल्या धनाची आठवण झाली. ते दोघे कुदळ घेऊन शेतात गेले.

दोघांनी मिळून एक शेत खोदले, पण धन काही मिळाले नाही. दुसरे शेत खोदले, तेथेही त्यांना धन मिळाले नाही. असे करता करता तिसरे व चौथेही शेत खोदले, तिथेही त्यांना धन मिळाले नाही.

दोन्ही मुले उदास होऊन घरी आली. त्यांच्या शेजारी हरदयाल राहत होते. ते दिनदयाळ यांचे चांगले मित्र होते. त्यांना आपल्या मित्राची मुले उदास झालेली दिसली. त्यांनी त्याचे कारण विचारले.

एक मुलगा म्हणाला, ''वडिलांनी सांगितले होते, की शेतामध्ये खूप धन पुरून ठेवले आहे; पण निश्चित कुठे ठेवले, हे मात्र सांगितले नाही. आम्ही दोघांनी चारीही शेत खोदले; परंतु धन काही मिळाले नाही. त्याची आम्हांला आता खूप आवश्यकता आहे.'' हे ऐकून हरदयालला वाईट वाटले. ही मुलं खूप आळशी आहेत, हे



त्यांना माहीत होते. ''निराश होऊ नका. आता लवकरच पाऊस पडेल. दोघांनी मिळून शेतात बी पेरा, नुसते रिकामे बसून काय फायदा होणार आहे ?'' या शब्दांत हरदयालनी त्यांना समजावले. दोन्ही मुलांनी विचार केला, की हरदयाल काका योग्य सांगत आहेत. दोघांनी शेतीचे काम सुरू केले. खूप कष्ट करून बी पेरले. थोड्याच दिवसांत शेतात चांगले पीक दिसू लागले. जे जे शेती पाहत होते, ते ते खूश होत होते. त्यांची स्तुती करत होते.

पिकांची कापणी झाली. धान्य बाजारात विकले गेले. दोन्ही मुलांना खूप पैसे मिळाले. ते दोघे आनंदाने घरी आले. हरदयालांना ही गोष्ट समजली. त्यांनाही आनंद झाला. त्यांनी दोघांना एके दिवशी बोलावून घेतले व म्हणाले, ''तुमच्या वडिलांनी शेतामध्ये सोने-चांदी गाडून ठेवले नव्हते, कष्टाचे धन गाडले होते. ते तुम्ही खोदून काढले. खरे धन तुम्हांला आज मिळाले. अशा प्रकारे कष्ट करा व धन मिळवा. कष्टाचे फळ नेहमीच चांगले असते. 'कष्ट हेच धन.'

लेखक - हरिकृष्ण देवसरे
मराठी अनुवाद - सौ. संध्या उपासनी

❑❑❑

हिंदी
बालभारती : इयत्ता २ री
तिसरी माला : १९९०

# २६. अनमोल साडी

खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. एका शहरात एक श्रीमंत व सज्जन माणूस राहत होता. त्याला एक तरुण लाडावलेला मुलगा होता. एक दिवस आपल्या खोडकर मित्रांबरोबर तो बाजारातून हिंडत असता, त्याची नजर अचानक एका दुकानावर पडली. ते एका विणकराचे दुकान होते. त्या विणकराची लांब दाढी व चेहऱ्यावरचे शांत भाव पाहून, तो कोणी संत असावा, असे पाहणाऱ्याला वाटायचे. त्याच्यासमोर साड्यांचा ढीग पडला होता.

विणकराला पाहून त्या तरुणाचा मित्र म्हणाला, ''अरे, तो काही साधासुधा माणूस नाही, त्याला लोक मोठा संत म्हणतात. तो कधी चिडलाय, रागावलाय असे कोणी पाहिलेले नाही.'' यावर तो तरुण म्हणाला, ''हे कसं शक्य आहे ? मी त्याला चिडवून दाखवतो. मोठा शांत स्वभावाचा नि संत समजतो का स्वत:ला ?'' एवढे म्हणून तो त्या विणकराजवळ गेला. विणकराने त्याला प्रेमाने म्हटले, ''ये बाळा, बैस. काय पाहिजे तुला ?'' एका साडीकडे हात दाखवत तो तरुण म्हणाला, ''मला ही साडी घ्यायचीय, काय किंमत आहे याची ?'' ''दोन रुपये,'' (आजचे दोनशे रुपये) तो विणकर म्हणाला. तरुणाने ती साडी हातात घेतली व त्याचे दोन तुकडे करत म्हटले, ''मला ही एवढी अर्धीच पुरे. याची किंमत काय होईल ?'' त्यावर विणकर म्हणाला, ''एक रुपया.'' त्या तरुणाने पुन्हा त्या साडीचे दोन तुकडे केले व एक तुकडा दाखवत विचारले, ''आता याची किंमत काय होईल ?'' ''अर्धा रुपया.'' शांतपणे विणकर उत्तरला. त्या तरुणाला वाटत होते, काही ना काही कारणाने तो चिडेल व त्याचा संतपणा फोल ठरेल, या हेतूने



त्याने साडीचे आणखी तुकडे तुकडे केले; पण तो विणकर स्थितप्रज्ञ राहिला. शेवटी तो तरुण म्हणाला, ''आता हे तुकडे विकत घेऊन मला काय उपयोग होणार ?'' यावर विणकर म्हणाला, ''बाळा, तू बरोबर म्हणतोस. हे तुकडे तुझ्या काय कामाचे ? राहू देत काही हरकत नाही.'' एवढे करूनही विणकर शांतच. तरुणाला आश्चर्य वाटले. नंतर त्याचे मन त्याला खाऊ लागले. जर तो विणकर त्याला रागावला असता, तर त्याला बरे वाटले असते; पण त्याने तसे काहीच केले नाही. उलट त्याच्याशी अत्यंत प्रेमाने शांतपणे बोलला. त्यामुळे त्या तरुणाला आपल्या कृत्याची लाज वाटू लागली. त्याने विणकराला म्हटले, ''या साडीचे हे दोनशे रुपये घ्या.'' त्यावर विणकर म्हणाला, ''हे तुकडे जोडून मी त्याचा काही उपयोग करीन. या तुकड्यांचा तुला काही उपयोग नाही, त्याचे पैसे मी तुझ्याकडून का घ्यावे ?'' त्यावर तो तरुण म्हणाला, ''माझ्याजवळ खूप पैसे आहेत, मला पैशाची काही परवा नाही; पण तुम्ही गरीब आहात. मी तुमच्या वस्तूचा नाश केला, तर मी त्याची नुकसानभरपाईही करायला हवी.'' तेव्हा त्याला समजावत विणकर म्हणाला, ''बाळा, अरे, रुपया-पैशाने भरून निघणारे हे नुकसान नाही. शेकडो शेतकऱ्यांच्या मेहनतीने कापूस उगवला. त्या कापसाचे सूत मी व माझ्या पत्नीने कातले. मी ते सूत रंगवून त्याची हातमागावर साडी विणली. कोणी जर ती साडी वापरली असती, तरच सर्वांच्या श्रमाचे चीज झाले असते. तू त्या साडीच्या चिंध्या केल्यास. आता त्या कोणाच्या कामास येणार ? एवढ्यांची मेहनत व्यर्थ गेली. तुझ्या पैशाने ही हानी थोडीच भरून निघणार आहे ? तुझे पैसे मी कसे स्वीकारू ? तूच विचार कर !''

विणकराच्या बोलण्यात कोठेही रागाचा अंश किंवा कडवटपणा नव्हता. एखाद्या प्रेमळ पित्याने आपल्या मुलाला समजावावे, तसे त्याने त्या तरुणास समजावले.

त्याच्या प्रेमळ शब्दाने तरुणाचे मन भरून आले. डोळे अश्रूंनी डबडबले. त्याने चटकन त्या थोर माणसाचे, त्या विणकराचे पाय धरले व क्षमा मागितली.

मराठी अनुवाद - सौ. वर्षा सु. प्रभू

❑❑❑

हिंदी
बालभारती : इयत्ता ३ री
पहिली माला : १९६९



## २७. नेताजी सुभाषचंद्र बोस

सुभाषचंद्र बोस यांचा जन्म ओरिसा राज्यातील कटक या शहरात २३ जानेवारी, १८९७ साली झाला. त्यांचे वडील वकील होते व आपला मुलगाही मोठा ऑफिसर बनावा अशी त्यांची इच्छा होती. त्याकरिता त्यांनी त्याला एका इंग्लिश शाळेत घातले. इंग्लिश शाळेत घातले, की मुलगा लवकर इंग्लिश वागणेही आत्मसात करील असं त्यांना वाटलं; पण छोट्या सुभाषला त्या शाळेतील इंग्लिश शिष्टाचाराचे वागणे काही पसंत पडले नाही. त्यांनी वडिलांना सांगितले, ‘‘मला नको ही शाळा. मी नाही या शाळेत जाणार.’’

त्यांचा बालहट्ट वडिलांना पुरवावा लागला व त्यांनी लवकरच सुभाषला एका भारतीय शाळेत घातले. त्या शाळेचे मुख्याध्यापक पांढरे स्वच्छ धोतर व कुडता घालून शाळेत येत असत. छोट्या सुभाषलादेखील हा पोशाख खूप आवडला. त्यांनी आईकडून तसा पोशाख मागून घेतला व तो घालून शाळेत गेला; पण जेव्हा वडिलांनी सुभाषला त्या पोशाखात पाहिले, तेव्हा त्यांना त्याचा खूप राग आला. त्या वेळी सुभाषने म्हटले, ‘‘माझे गुरूजी असेच कपडे घालतात. ते म्हणतात, ‘हाच आपला भारतीयांचा खरा पोशाख !’ नि मलाही हा पोशाख खूप आवडतो; म्हणून मी घातला.’’ खरे म्हणजे त्या पोशाखातले आपल्या सुभाषचे रूप वडिलांनाही पसंत पडले होते, म्हणून ते जास्त काही बोलले नाहीत.

सुभाषचंद्र लहानपणापासून असे निश्चयी होते. त्यांची आई त्यांना हिंदू धर्मातल्या शूर, साहसी वीरांच्या कथा ऐकवायची. दुर्गामातेच्या गोष्टी अंगाईगीतातून आठवून म्हणायची, यामुळे देश,

धर्माचे, प्रेमाचे बीज लहानपणीच रूजले. त्यांचा स्वभावही त्याप्रमाणे धीट व साहसी बनत गेला.

पुढे उच्च शिक्षणासाठी सुभाषचंद्र इंग्लंडला गेले व आपले शिक्षण संपवून मायदेशी परतले. इंग्रजांची नोकरी करणे त्यांना मान्य नव्हते. म्हणून ते भारतीय स्वातंत्र्यलढ्यात उतरले. इंग्रजांना सुभाषचंद्राच्या कार्याची कल्पना येताच त्यांनी सुभाषचंद्रांना तुरुंगात डांबले. तुरुंगातून सुटका झाल्यावर सुभाषचंद्र स्वराज्य दलाचे मंत्री झाले. स्वराज्य दलाचे पत्रक 'फॉर्वर्ड'मध्ये त्यांनी खूप स्फूर्तिदायक लेख लिहिले. त्यामुळे इंग्रज सरकार हैराण झाले व त्यांनी सुभाषचंद्रांना पुन्हा कैद केले व तुरुंगात टाकले.

तुरुंगात सुभाषचंद्रांची तब्येत बिघडली. इंग्रजांनी घाबरून त्यांना तुरुंगातून सोडले व त्यांच्याच घरात नजरकैदेत ठेवले; परंतु कोणासही संशय येणार नाही, अशा रीतीने वेश बदलून तेथून ते निसटले व अफगाणीस्तानातून थेट जर्मनीला जाऊन पोहोचले. तेथून पुढे ते जपानला गेले.

सुभाषचंद्रांनी जपानला गेल्यानंतर आझाद हिंद फौजेचे नेतृत्व केले. आझाद हिंद फौजेत सर्वधर्मीय लोक एकत्र झाले होते. त्यांच्या सेनेत महिलांचीही एक पलटण होती. त्याचे नेतृत्व लेफ्टनंट लक्ष्मी करत होत्या. स्वतंत्र भारताची भावना सर्वांच्या मनात जागृत झाली होती. सर्व हिरीरीने सेनेत भरती होत होते.

सुभाषचंद्रांच्या शब्दात जादू होती. त्यांच्या शब्दांचा लोकांवर प्रभाव पडे. सेनेत भरती होणाऱ्या प्रत्येक सैनिकाला अशी शपथ घ्यावी लागे, की "आम्ही कोणतेही कष्ट आनंदाने झेलू. कोणत्याही संकटाला हसत सामोरे जाऊ. रक्ताची होळी खेळू, रक्तात न्हाऊन निघू; पण भारतमातेस स्वतंत्र करू."



सुभाषचंद्र बोस स्वातंत्र्याच्या लढ्यातले मोठे सेनापती होते. सैन्याच्या जोरावर इंग्रजांना नेस्तनाबूत करायची त्यांची इच्छा होती; म्हणून त्यांनी आझाद हिंद फौजेचे नेतृत्व केले. ते देशबांधवांना म्हणत, "तुम्ही मला रक्त द्या, मी तुम्हांला स्वातंत्र्य मिळवून देतो."

नेताजी सुभाषचंद्र बोस विमानातून जपानला जाताना विमानाला आग लागली. या दुर्घटनेत सुभाषबाबूंचे देहावसान झाले असे म्हणतात.

आजही लोक सुभाषबाबूंना विसरलेले नाहीत. आजही सारे भारतीय त्यांच्यावर प्रेम करतात. आदराने त्यांना 'नेताजी' म्हणून संबोधतात.

मराठी अनुवाद - डॉ. अलका पोतदार

❑❑❑

हिंदी
बालभारती : इयत्ता ४ थी
चौथी माला : १९९८

# २८. अकबराचा पूल

अकबर नावाचा सुप्रसिद्ध राजा होऊन गेला.

एक दिवस तो वेश बदलून नावाडी बनला आणि यमुना नदीच्या काठावर गेला. थोड्या अंतरावर त्याला एक म्हातारी उभी असलेली दिसली. ती स्वतःशी काहीतरी पुटपुटत होती.

ती काय बोलते ते अकबराला जाणून घ्यावेसे वाटले. तो म्हातारीजवळ गेला. त्याने विचारले, ''काय बोलतेस आजी ?''

म्हातारी म्हणाली, ''नदीच्या पलीकडे माझा मुलगा काम करतो. आता तो भुकेनं व्याकूळ झाला असेल. त्याला जेवण दयायला मी निघाले होते; पण नावाडीच नाही. या नदीवर एक पूल असता, तर किती बरं झालं असतं !''

''असं ! चल, मीच तुला नदीपलीकडे नेऊन सोडतो,'' अकबर म्हणाला.

म्हातारीला नावेत बसवून अकबर नाव चालवू लागला. त्याच वेळी वारा सुटला. नाव प्रवाहात हेलखावे खात उलटली. दोघेही पाण्यात पडले. अकबराने म्हातारीला धरले आणि पोहत पोहत पलीकडच्या काठावर नेले.

आपला जीव वाचल्यामुळे म्हातारीला आनंद झाला. ती उपकाराची फेड करण्यासाठी अकबराला काही पैसे देऊ लागली.

अकबर म्हणाला, ''नको. तुमच्यासारख्यांना मदत केल्यानं मला आनंद झाला आहे.''

''किती उदार आहेस तू ! एवढं औदार्य आमच्या राजाकडे - अकबराकडेही नाही. ते असतं, तर त्याने आतापर्यंत इथे एक पूल बांधला असता !'' असे बोलून म्हातारी आपल्या मुलाकडे गेली.



नंतर अकबर राजाने यमुनानदीवर एक पूल बांधला. त्या पुलाला आजही 'अकबराचा पूल' असे म्हणतात.

लेखक - एम. व्ही. सुब्बराव
मराठी अनुवाद - उमा. वि. कुलकर्णी

❑❑❑

कन्नड
बालभारती : इयत्ता ३ री
तिसरी माला : १९९१

## २९. वाटणी

भरमप्पा नावाचा एक गरीब शेतकरी होता. त्याला दोन मुले होती. थोरल्याचे नाव काळू आणि धाकट्याचे नाव बाळू.

काळू स्वभावाने कपटी, तर बाळू थोडासा भोळा होता. त्याचा स्वभाव अगदी सरळ होता.

भरमप्पा मरायला टेकला, तेव्हा त्याने दोन्ही मुलांना जवळ बोलावले आणि सांगितले, ''काळू, तू तुझ्या धाकट्या भावाशी प्रेमाने वाग. तुम्ही दोघेही प्रेमाने आनंदात राहा.''

त्यांच्याकडे एक घोंगडे होते, एक गाय होती, एक चांगले शेत आणि त्यात एक उत्तम आंब्याचे झाड होते. काळूने धाकट्या भावाच्या भोळ्या स्वभावाचा फायदा करून घ्यायचा, असे ठरवले. त्याने बाळूला सांगितले, ''हे बघ बाळू, दिवसा घोंगडे तू वापर, रात्री मी वापरेन.' गाईचा पुढचा भाग तुझा आणि मागचा भाग माझा. आंब्याच्या झाडाचा वरचा भाग माझा आणि खालचा मुळाकडचा भाग तुझा.''

बाळूने हे मान्य केले.

असेच काही दिवस गेले. काळू रात्री उबदार घोंगडे पांघरून झोपत होता. बाळू थंडीत रात्रभर काकडत होता. गायीच्या खाण्या-पिण्याची जबाबदारी बाळूवर पडली. बाळू गायीला चारा घालून पाणी पाजायचा. गाय चांगली धष्टपुष्ट झाली आणि भरपूर दूध देऊ लागली. ते दूध पिऊन काळू माजला. राबराब राबून बाळू मात्र बारीक झाला.

काळू दूध आणि लोणी विकून पैसे मिळवू लागला. चांगले कपडे घालू लागला; पण त्याने दुसरे घोंगडे विकत आणले नाही.



काळूचे लग्न झाले. त्यानंतर बाळूचे कष्ट दुप्पट झाले. दिवसभर राबणे, पोटाला नीट अन्न नाही, अंगावर चांगले कपडे नाहीत. अशी त्याची अवस्था झाली.

दरवर्षी आंब्याच्या झाडाला हजारो आंबे लागत. सगळे आंबे काळू आणि त्याची बायको घेऊन जायचे.

बाळूला वाईट वाटले. घर सोडून निघून जावे, असे त्याला वाटू लागले; पण त्याला वडिलांचे शब्द आठवले. एकदा त्याने काळूला सांगितले, ''मला जास्त काही नको. तू जे जेवतोस ते मलाही दे. मी तुझा छोटा भाऊ आहे. मलाही दूध आणि आंबे दे. तुझ्याकडे पैसे साठले आहेत. त्यातून तू नवे घोंगडे आण. वडिलांचे जुने घोंगडे मला दे.''

काळू धाकट्या भावावर रागावला.

बाळूला काय करावे सुचेना. तो गप्प बसला.

बाळूची परिस्थिती रंगप्पांच्या लक्षात आली. रंगप्पा गावातले वयस्कर गृहस्थ होते. ते भरमप्पाचे जवळचे मित्रही होते.

बाळूचे हाल पाहून त्यांनी हुशारी केली. त्याला बोलवून काही गोष्टी सांगितल्या.

एका संध्याकाळी बाळूने कांबळं पाण्यात भिजवले आणि पाणी गळत असलेले घोंगडे काळूला दिले. काळू संतापला. तो रागावला, ''माझे घोंगडे का भिजवलेस ?''

''भिजवले तेव्हा कांबळं माझे होते !'' बाळूने शांतपणे उत्तर दिले.

''या थंडीत मी घोंगड्याशिवाय कसा झोपू ?'' काळूने विचारले.

''इतके दिवस मी जसा झोपत होतो तसेच !'' बाळू उत्तरला. ते

ऐकून काळू वैतागला.

दुसऱ्या दिवशी नेहमीप्रमाणे काळूची बायको दूध काढायला आली. बाळू वासराला घेऊन गायीपुढे उभा राहिला. भावजयीने तांब्याभर निरसे दूध काढले. त्यानंतर बाळूने गाईच्या नाकात गवताची काडी घातली. गाईने लाथ मारत उसळी घेतली. दुधाचा तांब्या उलटा झाला. सारे दूध जमिनीवर सांडले. भावजयीलाही मार बसला. काळू संतापाने बाहेर धावला; पण बाळूने ठणकावले, "गाईचा पुढचा भाग माझा आहे. समजले ?"

झाड आंब्यांनी लगडले होते. काळू आणि त्याची बायको झाडाजवळ आले. फळे उतरवण्यासाठी काळू झाडावर चढला. तेवढ्यात बाळू तिथे आला. त्याच्या हातात कुऱ्हाड होती. तो झाडाच्या बुंध्यावर कुऱ्हाडीने घाव घालू लागला. काळू गरजला, "बाळू, कसल्या या माकडचेष्टा ?"

"झाडाचे खोड आणि मूळ माझे आहे !" एवढं सांगून बाळू पुन्हा कुऱ्हाड चालवू लागला. काळू गडबडीने खाली उतरला."

एवढ्यात रंगप्पा तिथे आले. काळू त्यांना बाळूचा दुष्टपणा सांगू लागला. त्यावेळी रंगप्पा म्हणाले, "काळू, तुझा धाकटा भाऊ चांगला आहे. तुम्ही दोघांनीही वडिलांना एकत्र 'प्रेमाने राहू' असे वचन दिले आहे. मी तुमच्या वडिलांचा मित्र आहे. मीच बाळूला हा उपाय सुचवला होता. तू काही लहान नाहीस. विचार कर. धाकट्या भावाबरोबर नीट मायेने वाग."

रंगप्पांचे बोलणे ऐकून काळूचे डोळे उघडले. त्याला आपली चूक पटली. त्याने धाकट्या भावाची क्षमा मागितली. बाळूच्या भावजयीनेही धाकट्या दिराची क्षमा मागितली.

काळूने बाळूचे लग्न लावून दिले. एक नव्हे, दहा आंब्याची झाडे



लावली. आठ गाई विकत घेतल्या.

'एकत्र राबण्यातच आनंद आहे' हे त्यांना समजले. सगळे सुखाने एकत्र राहू लागले.

- श्रीमती माया पाटील
(कन्नड लोककथेवर आधारित)
मराठी अनुवाद - उमा वि. कुलकर्णी

❑❑❑

कन्नड
बालभारती : इयत्ता ४ थी
तिसरी माला : १९९२

## ३०. योगिताची गोष्ट

माझे वडील 'भारतीय' आहेत. माझी आई 'फ्रेंच' आहे. माझा जन्म पुणे शहरात झाला. आईवडिलांनी माझे नाव योगिता ठेवले; पण मला सगळे प्रेमाने 'योगी' म्हणून हाक मारतात.

जन्मानंतर एका वर्षानी माझे पाय अशक्त असल्याचे जाणवले. माझ्या नातेवाईकांनी डॉक्टरांचा सल्ला घेतला आणि मुंबईच्या जसलोक हॉस्पिटलमध्ये मला दाखल करण्यात आले. माझ्या पायावर लहानशी शस्त्रक्रिया करण्यात आली. देवाच्या कृपेने मी बरी झाले. चार वर्षानंतर मी हळूहळू चालू लागले.

वयाच्या पाचव्या वर्षी मी पोहायला शिकले. मी रोज सायंकाळी तलावात पोहायला जात असे. लहानपणीच मी सर्व प्रकारचे व्यायाम करू लागले. मी योगही करू लागले. याचा चांगला परिणाम असा झाला, की बारा वर्षांनंतर माझ्या पायांना पूर्ण बळ आले. मी फारच आनंदी झाले. मी शाळेच्या सर्व खेळांमध्ये आणि स्पर्धांमध्ये मुक्तपणे भाग घेऊ लागले. मला खेळांमध्ये आणि पोहण्यामध्ये अनेक बक्षिसे मिळाली.

आता मी महाविद्यालयात शिकते. आज माझ्यासाठी अतिशय आनंदाचा दिवस आहे. सर्व वृत्तपत्रांत माझ्या छायाचित्रासह विशेष मोठी बातमी छापली आहे, की पुणे विद्यापीठामध्ये पोहण्याच्या स्पर्धेमध्ये 'योगिता गजवाणी' चा पहिला क्रमांक. या बातमीने मला माझ्या परिश्रमाचे गोड फळ मिळाल्याचे समाधान दिले. खरोखरच आजचा दिवस माझ्यासाठी भाग्यवान दिवस आहे.

मुलांनो ! नेहमी लक्षात ठेवा. माझ्या जीवनापासून दोन गोष्टी शिकून घेतल्या. एक - देश कोणताही असो, तुम्ही कोणत्याही समाजात जन्मलेला असा, तुमचा धर्म कोणताही असो निसर्गापुढे आपण सगळे समान आहोत, दुसरी - तुम्हांला जे मिळवायचे आहे, त्यासाठी हिम्मत आणि आत्मविश्वास याला कठोर परिश्रमाची जोड दिल्यास तुम्हांला यश नक्कीच प्राप्त होईल.

लेखक - नंदलाल हिंदुजा
मराठी अनुवाद - तोलाराम रहेजा

❑❑❑

सिंधी
बालभारती : इयत्ता ४ थी
तिसरी माला : १९९२

## ३१. भक्त कंवरराम

भक्त कंवरराम यांचे नाव आपण सर्वांनी ऐकले आहे. त्यांचा जन्म सिंधमधील जरिवार गावात झाला होता. त्यांच्या वडिलांचे नाव भाई ताराराम होते.

भक्त कंवरराम यांचा आवाज फार गोड होता. त्यांच्या रागात रस भरलेले असे. हजारो माणसे त्यांची रसपूर्ण गीते ऐकण्यासाठी येत असत. त्यांची गाणी ऐकून माणसे तृप्त होत आणि पैशांनी कंवररामाची झोळी भरून टाकत. मात्र हे रुपये ते स्वत:च्या उपयोगासाठी घेत नसत. लोकांकडून मिळालेला सगळा पैसा ते गोरगरिबांमध्ये वाटत. स्वत:च्या पोटापाण्यासाठी लहानसे दुकान चालवत असत. जातीपातीचा त्यांनी कधीही भेदभाव केला नाही.

एकदा एक श्रीमंत सावकार भक्त कंवररामकडे दर्शनासाठी आला. भक्त कंवररामवर त्या सावकाराची फार श्रद्ध होती. तो हलव्याच्या दोन पेट्या आणि रेश्मी कपड्यांची जोडी घेऊन आला. त्याने शंभर रुपये रोखही आणले होते. ते सर्व काही त्याने भक्त कंवररामांसमोर ठेवले. तो म्हणाला, क़ी 'या माझ्या भेटीचा स्वीकार व्हावा आणि रेश्मी कपड्यांची जोडी तुमच्या कुटुंबियांसाठी आणली आहे. त्याचाही स्वीकार व्हावा.''

भक्त कंवररामानी हलवा तेथेच सगळ्यांना वाटून टाकला. त्यांच्या घराजवळ एक गरीब बाई राहात होती. तिच्या मुलीचे लग्न ठरलेले होते. तिच्या लग्नासाठी शंभर रुपये त्यांनी त्या बाईकडे पाठवले आणि रेश्मी कपडे बाजूला ठेवून दिले.

एकदा प्रवास करता करता एक बाई तेथे आली. तिने मळके आणि फाटके कपडे घातलेले होते. ती कंवररामला म्हणाली,



''भक्त साहेबांनो, उद्या ईद आहे. माझे कपडे फाटून गेले आहेत. मला एक नवा कपडा घेऊन द्या.''

भक्त साहेबांनी मुकाट्याने रेश्मी कपडे त्या मस्तानीसारख्या बाईला देऊन टाकले. ती मस्तानीबाई भक्त साहेबांना आशीर्वाद देत निघून गेली.

भक्त कंवररामांनी आपण दिलेली रेशमी जोडी एका बाईला दिली. हे ऐकून सावकाराचा चेहरा उतरला. कंवररामांनी त्याचा उतरलेला चेहरा पाहिला. ते म्हणाले, ''ऐक बाबा, तू भेट अर्पण केलीस. मी स्वीकार केला. आता मी देवाचे नाव घेऊन ती देऊन टाकली.''

भक्त कंवरराम साहेबांच्या मनात जराही लोभ नव्हता. त्यांना पुष्कळ महागड्या वस्तू भेट मिळत. ते स्वत:साठी कोणतीही वस्तू घेत नसत. मिळेल ते सर्व गोगरिबांना देऊन टाकायचे. असे ते दयाळू आणि मोहमुक्त होते. जेथे तेथे त्यांची प्रशंसा व्हायची. आजही भक्त कंवररामाचे नाव सर्वत्र घेतले जाते.

मराठी अनुवाद - तोलाराम रहेजा

❑❑❑

सिंधी
बालभारती : इयत्ता २ री
दुसरी माला : १९७९

# ३२. जाणता जादूगार

एके काळी एका दूर देशात कॅरली नावाची एक मुलगी आपल्या आईवडिलांबरोबर राहत होती. तिला खोटं बोलण्यात आणि थापा मारण्यात खूप मजा वाटत असे. अनेक वर्षांपर्यंत तिच्या आईवडिलांना तिने सांगितलेल्या गोष्टी खऱ्या वाटत राहिल्या, पण कॅरली किती थापा मारते, हे हळूहळू त्यांच्याही लक्षात आलं आणि त्यांना खूप वाईट वाटलं. आपल्या स्वत:च्या मुलांच्या शब्दावर विश्वास ठेवता येऊ नये, ही आईवडिलांच्या दृष्टीने फारच दु:खाची गोष्ट असते.

त्यांनी कॅरलीची ही वाईट सवय मोडण्यासाठी अनेक उपाय केले; पण त्यांना यश आले नाही. शेवटी कॅरलीच्या आईबाबांनी तिला मर्लिन नावाच्या एका जाणत्या जादूगाराकडे न्यायचे ठरवले. त्या काळी खोटं बोलणाऱ्या मुलांची खोड मोडण्यासाठी त्यांना मर्लिनकडे नेत असत.

मर्लिन जगातला सर्वांत प्रामाणिक माणूस होता. तो काचेच्या भिंती असलेल्या महालात राहत असे; त्यामुळे त्याच्याबद्दलची सर्व खरीखुरी माहिती सर्वांना कळत असे. त्याने आयुष्यात कधीही कोणालाही खोटं सांगितलं नव्हतं. कॅरली त्याच्याकडे पोचताच ताबडतोब त्याने काय भानगड आहे हे ओळखलं. कॅरलीच्या आईने आपण मर्लिनकडे काय काम घेऊन आलो आहे, हे सांगायला सुरुवात केली; पण सर्व हकीकत बोलून दाखवताना तिला इतकं शरमिंदं वाटू लागलं, की मर्लिनने हात वर करून तिला थांबण्याचा इशारा केला. तो म्हणाला, ''तुम्ही माझ्याकडं कशासाठी आला आहात, ते मी ओळखलं आहे. तुमच्या मुलीला माझ्याकडं का



आणावं लागलं, ते मला चांगलं माहीत आहे. ती जगातली सर्वांत थापाडी मुलगी आहे आणि तिनं तुम्हांला खूपच दु:खी केलेलं आहे.''

कॅरली कावरीबावरी झाली. आपले तोंड कुठे लपवावे तेच तिला कळेना. ती आईच्या एप्रनमागे दडली. तिला सांभाळून घेण्यासाठी तिचे वडील तिच्यापुढे येऊन उभे राहिले. काहीही करून कॅरलीचं खोटं बोलणं बंद करावं, असं तिच्या आईवडिलांना वाटत होतं खरं; पण तिला धडा शिकवताना तिला कुठल्याही प्रकारे दुखवावं, त्रास व्हावा असंही त्यांना वाटत नव्हतं.

मर्लिन म्हणाला, ''भिऊ नका. मी कॅरलीला काहीही करणार नाही. मी तिला फक्त एक भेट देणार आहे.'' त्यानं कपाट उघडून एक सुंदर माळ बाहेर काढली. त्या माळेच्या मधोमध लखलखीत हिऱ्याचे एक पदकही बसवलेलं होतं. मर्लिननं तो हार कॅरलीच्या गळ्यात घातला. तो म्हणाला, ''जा आता. मी तुमच्या मुलीबरोबर खोटं बोलण्यावरचा बिनतोड उपाय दिला आहे.'' मग कॅरलीकडे पाहत थोडा कडकपणे तो तिला म्हणाला, ''एक वर्षानंतर मी माझी माळ परत घेण्यासाठी येईन. तोपर्यंत ही माळ कधीही गळ्यातून काढायची नाही. काढलीस, तर तुझ्यावर एक भयानक संकट येईल.''

कॅरली आणि तिचे आईबाबा घरी परत आले. दुसऱ्याच दिवशी कॅरली शाळेत गेली. तिची माळ पाहण्यासाठी सगळ्या मुली तिच्याभोवती जमा झाल्या. ''कुठं मिळाली गं तुला ही माळ ?'' त्या विचारू लागल्या.

''मी बरेच दिवस आजारी होते.'' कॅरलीने बेधडक थाप ठोकली. ''मी बरी झाल्यावर आईबाबांनी मला ही सुंदर माळ भेट

दिली.''

सर्व मुली आश्चर्याने बघतच राहिल्या; कारण पदकातल्या लखलखत्या हिऱ्याची चमक एकाएकी अगदी मंद झाली होती.

''हो, मी खूप दिवस आजारी होते.''

कॉरली पुन्हा खोटं बोलली. आता माळेतल्या हिऱ्याचा इकडे एक साधासा दगडच झाला. पुन्हा सर्व मुली आपापसात कुजबुजू लागल्या. कॉरलीनेपण माळेकडे पाहिलं आणि ती घाबरूनच गेली.

''खरं तर मी मर्लिन जादूगाराकडे गेले होते.'' ती मोठ्यानं म्हणाली. पुढे आणखीन काही थापा मारायची तिची हिंमतच होईना. लगेच तिची माळ पुन्हा चमचम करू लागली. सगळ्या मुली हसायला लागल्या आणि कॉरलीला खूपच लाजल्यासारखे झाले.

''हसायला काय झालं ?'' ती म्हणाली, ''त्यानं आमचं खूप आदरातिथ्य केलं. आम्हांला नेण्यासाठी त्यानं त्याची सहा पांढऱ्या घोड्यांची सुंदर घोडागाडी पाठवली होती. त्यात गुलाबी रेशमी गाद्या होत्या आणि त्यांना सोनेरी झालर होती.''

कॉरलीची थाप सांगून होईपर्यंत मुली पुन्हा जोरजोरात हसू लागल्या होत्या. कॉरलीने पुन्हा गळ्यातल्या माळेकडे पाहिले. प्रत्येक थापेबरोबर माळेची लांबी वाढत गेली होती आणि पदकातला हिरा आता जमिनीलाच टेकला होता.

''लंब्या लंब्या बाता मारतेस !'' मुली चिडवू लागल्या. मग कॉरली म्हणाली, ''बरं, मी खरं काय तेच सांगते आता. आम्ही पायीपायीच गेलो होतो.'' माळेची लांबी पुन्हा पहिल्याइतकी झाली. ''पण मर्लिननं मला काहीही न बोलता ही माळ दिली.'' आता तिची माळ इतकी आखूड झाली, की तिच्या गळ्याला फास



बसू लागला.

''तू पूर्ण काय ते खरं खरं अजूनही सांगत नाहीयेस.'' मुली म्हणाल्या.

''हो. खरं म्हणजे मर्लिन म्हणाला, की मी जगातली सर्वांत थापाडी मुलगी आहे.'' असे म्हणताच कॉरलीच्या गळ्यावरची माळेची पकड काहीशी सैल झाली.

मुलींना कॉरलीची कीव आली. एकीने विचारले, ''तू ही माळ काढून का नाही टाकत ?''

कॉरलीने काहीच उत्तर दिलं नाही. त्यावर तिची माळ वर-खाली उड्या मारून नाचायला लागली आणि विचित्र आवाज काढू लागली.

''तू नक्की काहीतरी लपवते आहेस.'' मुली पुन्हा हसू लागल्या.

''माळ कधीही काढायची नाही, असे मर्लिनने बजावले आहे. ती काढली, तर माझ्यावर भयानक संकट येईल.''

त्या अजब माळेचे हे प्रताप चालूच राहिले. कॉरली खोटं बोलली, की त्यातल्या हिऱ्याची चमक मंद होई. लंब्याचवड्या बाता मारल्या, की माळेची लांबीही वाढे. खरं काय ते सगळं सांगितलं नाही, तर माळ आकसून जाई. प्रश्न विचारल्यावर कॉरली काहीच बोलली नाही, तर माळ नाचू लागे. आता असल्या विचित्र माळेसारखा सवंगडी असल्यावर कोणाचीही थापा मारण्याची सवय कशी पटकन मोडेल, हे तुमच्या लक्षात आलंच असेल.

आपण मारलेली एकही थाप पचणार नाही, हे समजल्यावर कॉरलीने खोटं बोलायचं पार सोडून दिलं. ती खरं बोलू लागली आणि खरं बोलण्यानं तिला इतका आनंद वाटू लागला, की तिला

स्वत:लाच खोटं बोलणं आवडेनासं झालं.

वर्ष संपायच्या कितीतरी आधीच मर्लिनने येऊन त्याची माळ परत नेली. आता कॉरलीला त्या माळेची काहीही गरज नाही, हे त्यानं जाणलं होतं.

लेखक - ज्यों मेस

मराठी अनुवाद - मृणालीनी देसाई



इंग्रजी
बालभारती : इयत्ता चौथी
दुसरी माला : १९८३



## ३३. मनोज

आईबाबा आणि आजीआजोबांबरोबर मनोज एका मोठ्या फ्लॅटमध्ये राहायचा. आईबाबांना दिवसभर कामासाठी बाहेर जावं लागायचं. मनोज घरीच आजीआजोबांजवळ असायचा. त्याची आजी त्याला अंघोळ घालायची, भरवायची. त्याला गोष्टी वाचून दाखवायची आणि निजवायची. संध्याकाळ झाली, की मनोज आजोबांबरोबर बागेत फिरायला जायचा. बागेत तऱ्हेतऱ्हेचे प्राणी होते. आजोबा त्याला कधी प्राणी पाहायला न्यायचे, तर कधी त्याला झोपाळ्यावर, घसरगुंडीवर खेळायला न्यायचे. एखाद्या दिवशी आजोबांना कंटाळा आला, तर ते दोघेजण बाल्कनीत बसून येणाऱ्याजाणाऱ्या गाड्यांची मजा पाहायचे. आजोबांनी मनोजला कितीतरी गोष्टी शिकवल्या होत्या. कात्री, हातोडा, स्क्रूड्रायव्हर अशी साधनं कशी वापरतात, तेसुद्धा आजोबांनी त्याला शिकवलं होतं. मनोजला त्याचे आजीआजोबा खूप खूप आवडायचे.

रात्री मनोजचे आईबाबा कामावरून परत आले, की सगळेजण एकत्र जेवायला बसायचे. घरच्या माणसांसाठी स्वत: स्वयंपाक करायला आजीला फार आवडायचं. जेवायच्या टेबलावर आई सुरेखशी पानं मांडायची. दिवसभरातल्या गमतीजमती मनोज आईबाबांना सांगायचा. असे मजेत दिवस चालले होते.

दिवस, महिने, वर्षे उलटली. मनोज आता उंच झाला होता आणि मोठ्या शाळेत जायला लागला होता. आईबाबांचे काम तर खूपच वाढलं होतं. आजीआजोबा मात्र आता खूप थकले होते. लांबवर फिरायला जाणे आजोबांना जमत नसे. घरातल्या घरात फिरतानासुद्धा त्यांना काठी घ्यावी लागे. आजीलासुद्धा

भांडीकुंडी हाताळताना त्रास व्हायचा. पहिल्यासारखं घरकाम, स्वयंपाक करायला आजीला जमेना. हळूहळू आजीनं ते बंदच केलं आणि स्वयंपाकाला बाई ठेवली.

रात्रीचं जेवण मात्र अजूनसुद्धा सगळेजण एकत्रच करायचे. आजीआजोबा सावकाश जेवायचे. म्हातारपणामुळे त्यांचे हात थरथरत असत. असंच एकदा जेवताना आजीच्या हातून एक काचेचं सुंदरसे भांडे निसटले आणि जमिनीवर पडून त्याचे तुकडे झाले. आजोबांच्या हातून एकदा बशी फुटली. दुसरे दिवशी आजीआजोबांसाठी आईनं साधीशी लाकडी ताट-वाटी मांडली. आजीआजोबांना जरा वाईट वाटलं; पण ते काही बोलले नाहीत. खरं म्हणजे त्या दिवशी जेवताना कोणीच काही बोललं नाही. गप्पगप्प राहूनच जेवणं झाली. जेवण झाल्यावर मनोज बाल्कनीत जाऊन काहीतरी खाटखुट करत होता. आईनं विचारलं, ''काय चाललंय रे मनोज ?''

''मी ना, या लाकडाच्या फळीच्या ताट-वाट्या करतोय.''

''का रे बाबा ?'' ''मग, तू आणि बाबापण म्हातारे व्हाल, की नाही आजीआजोबांसारखे, तेव्हा तुम्हांलापण लागतील ना अशा ताट-वाट्या !'' हे बोलणं ऐकल्याबरोबर आईला एकदम गलबलून आले. आईनं मनोजला जवळ घेतलं आणि ती म्हणाली, ''खरंच रे मनोज, चुकलं माझं. तुझ्यामुळे मला माझी चूक कळली. आता नाही बरं मी आजीआजोबांना वेगळी ताट-वाटी ठेवणार.''

मराठी अनुवाद - धनवंती हर्डीकर

❑❑❑

इंग्रजी
बालभारती : इयत्ता ३ री
चौथी माला : १९९८



# ३४. राजा ब्रूस आणि कोळी

फार फार वर्षांपूर्वी स्कॉटलंडवरती ब्रूस राजा राज्य करत होता. फार चांगला राजा होता तो; पण त्यालासुद्धा काही शत्रू होते.

अशाच एका ताकदवान शत्रूनं एकदा मोठं सैन्य घेऊन स्कॉटलंडवर हल्ला केला. शत्रूचं सैन्य फार मोठं आणि ब्रूस राजाचं कमी. त्यांच्यात युद्ध झालं. त्याचा काय परिणाम होणार ? ब्रूस राजाचे कितीतरी पराक्रमी सैनिक ठार झाले आणि कितीतरी जखमी झाले. ब्रूस राजाला रणांगणातून पळ काढावा लागला. शत्रूनं त्याचा पाठलाग सुरू केला.

शत्रूच्या भीतीनं राजा ब्रूस सारखा पळत होता. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी पळून पळून राजा ब्रूस थकला होता. खूप दमला होता. शिवाय पराभव झाल्यामुळे तो मनातून खूप दु:खी झाला होता. सरतेशेवटी तो एका जंगलात पोचला. राजा ब्रूसला त्या जंगलात एक गुहा दिसली. राजा ब्रूस त्या गुहेत शिरला आणि थकून खाली बसला. 'सुटलो शत्रूच्या तावडीतून' तो स्वत:शीच म्हणाला.

काही वेळानंतर ब्रूस राजाचं लक्ष अचानक गुहेच्या एका भिंतीकडे गेलं. तिथे एक कोळी जाळं विणत होता. जाळं विणताना कोळी भिंतीवर चढला, मधेच खाली पडला. तो कोळी पुन्हा त्या भिंतीवर चढला, पण परत खाली पडला. असं सहा वेळा घडलं; परंतु त्या कोळ्यानं आपले प्रयत्न थांबवले नाहीत. त्यानं चिकाटीनं पुन्हा पुन्हा भिंतीवर चढण्याचा प्रयत्न केला आणि शेवटी एकदाचा गुहेच्या छतापर्यंत पोचला.

'एवढासा किडा; पण किती शूर आहे हा !' राजा स्वत:शीच बोलला, 'छोट्याशा कोळ्या, तूच माझा गुरू. तुझ्यासारखाच

मीसुद्धा पुन्हा पुन्हा प्रयत्न करीन. मी माझ्या शत्रूचा पराभव करीन आणि त्याला माझ्या देशातून हाकलून देईन.'

त्यानंतर राजा ब्रूसनं ती गुहा सोडली आणि तो आपल्या प्रजेकडे परत गेला. राजा ब्रूसचे सारे सैनिक त्याच्याभोवती गोळा झाले. त्यानंतर पुन्हा तिथं मोठं युद्ध झालं. या वेळी मात्र राजा ब्रूसच्या सैन्यानं शत्रूचा पराभव केला आणि शत्रूला स्कॉटलंडमधून हाकलून दिलं.

मराठी अनुवाद - संतोष पवार



इंग्रजी
बालभारती : इयत्ता २ री
दुसरी माला : १९८१